


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

२८३१

संपादक - यशवंत दिनकर पेंढारकर

वर्ष २३वे अंक १ला (९४) एप्रिल-जून १९५०

संपादक - रामचंद्र शंकर वाळिंबे

वर्ष २३वे अंक २रा (९५) जुलै-सप्टेंबर १९५०
वर्ष २३वे ” ३रा (९६) ऑक्टोबर-डिसेंबर १९५०
वर्ष २३वे ” ४था (९७) जानेवारी-मार्च १९५१

अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येणें वाग्यज्ञें तोषावें
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष २३ वें : अंक १ ला ९४

एप्रिल–जून १९५०



संपादक

अनुक्रमणिका



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मराठी वाङ्मये तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

# भौतिक शास्त्रें – भाषा आणि परिभाषा
# धोरण काय असावें ?

लेखक :
सखारामपंत आपटे

( परिषदेच्या परिभाषा-मंडळाकडून )

[ कांही महिन्यांपूर्वी प्रि. दि. धों. कर्वे यांचें, ' रसायनशास्त्राच्या विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमानुसार लिहिलेलें पाठ्यपुस्तक– प्रागारिक रसायन प्रथम पुस्तक'–या नांवाने प्रसिद्ध झालें. त्याची एक प्रत परिषदेकडे अभिप्रायार्थ आली. ' मराठी भाषाभिमानी विद्वानांची या पुस्तकास मान्यता मिळेल अशी आशा आहे ' असें ग्रंथकाराने आपल्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे.सर्व भौतिक शास्त्रें मराठींतून शिकविलीं गेलीं पाहिजेत,ही गोष्ट कित्येक विचारी लोक दोन तीन तपें प्रतिपादीत आले आहेतच. "मराठी भाषेंतील हा पहिलाच प्रयत्न" आहे असें प्रस्तुत ग्रंथकाराचें म्हणणें आहे. या सर्व गोष्टी लक्षात आणून मराठी भाषाभिमानी सर्व जाणत्या लोकांनी आज, आळस झाडून औदासीन्य टाकून, विचार करावयास पाहिजे की भौतिक शास्त्रें आपल्या लोकांमध्यें बद्धमूल होण्यास कशा प्रकारचें शिक्षण आपणांस पाहिजे,त्या शिक्षणाच्या सोयीकरतां कोणत्या प्रकारचीं पुस्तकें आपणांस हवींत, तज्ज्ञ लोक तशीं तीं आपणांस पुरवूं लागले आहेत काय ? प्राध्यापक कर्वे यांच्या पुस्तकाने मराठी भाषेच्या भौतिक शास्त्रीय दालनांत शोभेशी भर पडली आहे काय ? अशा विचारांना खरोखर चालना मिळावी म्हणून हा धोरणविषयक लेख, प्रथमतः प्रास्ताविक म्हणून, शास्त्रीय परिभाषामंडळाकडून आला आहे. वरील पुस्तकाचें थोडेंबहुत विस्तृत परीक्षण पुढें यावयाचें आहे. ]

१. सुमारे ४० वर्षांपूर्वींची गोष्ट*. फर्ग्युसनचे प्राध्यापक विश्वनाथपंत नाईक गणिती व शिक्षणशास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्ध होते. त्यांची ज्योतिष्यकीय व्याख्यानें आधूनमधून सार्वजनिक रीत्या मराठींतून होत. तीं शास्त्रीय असूनसुद्धा अत्यंत सुबोध, मनांत पक्की ठसणारीं, असत. बुद्धिज्ञान वाढविण्यास स्वभाषेइतकें सामर्थ्यसंपन्न दुसरें साधन नाहीच. स्वभाषयैव सर्वेषां बोधायनमनुत्तमम्, ही गोष्ट मनांत होतीच; तीच ह्या व्याख्यानश्रवणाच्या सुयोगाने ठाम झाली. परंतु स्वभाषेंतील भौतिक शास्त्रीय वाङ्मय पाहावें तों तीत तें नाहींच म्हटलें तरी चालेल अशी स्थिति. मनाचा मात्र निर्धार झाला की आपण धेडगुजरी किंवा खिचडी भाषा, जशी बराच मोठा सुशिक्षित समाज बिनदिक्कत वापरीत असलेला दिसतो तशी खिचडीभाषा, होतां होईतो वापरावयाची नाही. हा निर्धार तडीस न्यावयाचा तर साक्षेपाने स्वभाषेचा अभ्यास आणि त्याच्याच बरोबर संस्कृतचा अभ्यास चांगला केला पाहिजे. एकीकडे या गोष्टी करीत राहिलें पाहिजे, तर दुसरीकडे हल्लींची समृद्ध व समर्थ जी इंग्रजी भाषा तिचेंहि परिशीलन अगदी ठाकठिकीनें केलें पाहिजे; आणि अर्थात् इंग्रजी भाषेंत जें भौतिक शास्त्रीय ज्ञान भरलेलें आहे तेंहि अगत्यपूर्वक, खऱ्या अर्थाने, आत्मसात् केलें पाहिजे.

---

* चाळीस वर्षांपूर्वींचे हे दोन तीन प्रारंभिक उल्लेख कांहींसे वैयक्तिक असले तरी त्यांत महत्वाच्या अर्थाची सूचना भरलेली आहे हें कृ. क. वाचकांनी लक्षांत घ्यावें.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

**२. भौतिक शास्त्राचें ज्ञान, पारिभाषिक शब्दांवाचून, द्यावयाचें-घ्यावयाचें ही गोष्ट शक्यच नाहीं.** कित्येक लोकांना वाटतें कीं, इंग्रजींत पॉप्युलर पॉप्युलर म्हणून ज्याला म्हणतात तसलें भौतिक-शास्त्रीय वाङ्मय विपुल आहे; आणि त्याच्या वळणावर आपण आपली भाषा जर ठेविली तर ज्ञानप्रसारार्थ पारिभाषिक संज्ञांची जरूरी नाहीं. परंतु ही त्यांची समजूत भ्रमनिष्ठ आहे. खऱ्याखुऱ्या लोकार्थीय (popular) वाङ्मयाची 'युक्ति' अशी आहे कीं, त्यांत जिकडेतिकडे एकंदरींत पुष्कळ साधीं साधीं आणि आकर्षक वाक्यें असलीं तरी पारिभाषिक संज्ञा अधूनमधून असावयाच्याच. पण त्या पारिभाषिक संज्ञा एकमेकींपासून इतक्या दूर दूर आणि विरळ ठेवलेल्या असावयाच्या कीं, एखाद्या प्रकरणांत पारिभाषिक संज्ञा नवीन अशा फारतर दोनतीनच आढळाव्यात. त्या सुद्धा, त्यांची तोंडओळख व्हावयाच्यावेळीं म्हणजे पहिल्याप्रथम येतांना, अशा खुबीदार रीतीनें यावयाच्या कीं त्या संज्ञेचा अर्थ सहज उमगून ती संज्ञा एखाद्या जुन्या मित्राप्रमाणें लवकरच परिचयाची वाटावयाला लागावी. खऱ्याखुऱ्या लोकार्थीय वाङ्मयाचें हें मर्म न जाणतांच कित्येक लोकांची समजूत अशी कीं लोकार्थीय वाङ्मयाला पारिभाषिक संज्ञांची गरज नाहीं. ही समजूत अगदी खोटी आहे. मात्र ही गोष्ट पटण्याला एवढी खबरदारी घ्यावी लागते की, आपण जें लोकार्थीय **शास्त्रीय** वाङ्मय म्हणून हातीं घेतों तें खरोखरी **तसें** आहे; कारण कित्येक वेळां असें होत असतें . की, लोक ज्याला लोकार्थीय शास्त्रीय वाङ्मय म्हणतात तें वस्तुतः—म्हणजे शास्त्रीय दृष्ट्या पाहतां—गबाळ गचाळ वाङ्मयांत जमा असतें; त्याला शास्त्रीय म्हणणेंच चुकीचें असतें.

३. आमच्या लहानपणीं ( परिभाषा मंडळाच्या लहानपणीं ) असें म्हणणारे ज्येष्ठ लोक भेटले कीं, आपलें पूर्वीचे संस्कृत वाङ्मय—वेद, वेदान्त, न्याय, वैशेषिक इत्यादि तत्त्वज्ञानें—काव्यें देखील न वगळतां चांगलीं अभ्यासावीं म्हणजे तुम्हांला पारिभाषिक संज्ञा हव्या तितक्या सांपडतील; आणि तुमचें आधुनिकांचें निम्में अधिक काम त्यावरच भागेल. ही गोष्ट खरीच आहे पण कोणत्या अर्थानें ! इसापनीतींतल्या एका शेतकरी शहाण्या माणसानें आपल्या मुलाला मरणसमयीं सांगितलें कीं "आपल्या शेतांत, कुठें तें विसरलों, पण खूपच खूप सोनें पुरून ठेवलेलें आहे; तूं तें खणून काढ." या गोष्टींतल्या सोनें सांपडण्याप्रमाणेंच तें आहे. आपल्याला ज्या हव्यात त्या पारिभाषिक संज्ञा आयत्याच या धुंडाळींत आपल्या हातीं लागतील अशा आशेनें हें आलोडन केल्यास तें व्यर्थच ठरतें. मात्र या आलोडनाचा लाभ फार मोठा, यांत शंका नाही. त्यानें आपलें अर्धेंअधिक काम भागतेंच; कारण **संस्कृत भाषेंतील शब्दांचें भांडार** किती मोठें आहे आणि संस्कृत भाषेची 'स्तबकरिता' प्रसव-शीलता, पिकाऊपणा किती प्रचंड आहे हें त्या आलोडनांत आपल्या लक्ष्यांत आल्यावाचून राहात नाहीं. आणि असा प्रत्यय आपला आपणांलाच येतो कीं, अमुक रेखीव अर्थ स्पष्टपणें आपणांला व्यक्त करावयाचा आहेना, कांहीं हरकत नाहीं; असा असा शब्द बनतो आणि इष्ट अर्थ व्यक्त करण्याचें सामर्थ्य त्यांत खास आहे. आपण तो वापरावयास लागूं. शब्दाचा अभिजातपणा आणि वापरणाऱ्याचा **अनुभाव** (power of experience, moral influence) या दोन्हींच्या बळावर त्यामध्यें तो अर्थव्यक्तीचा गुण येतोच. तात्पर्य हेंच कीं, या संस्कृतच्या आलोडनापासून आपली भूक भागते; परंतु त्या कामीं आयते लाडू उचलले की खाल्ले अशा रीतीची ही क्षुधा—शांति होत नाहीं. तर ती अशा पद्धतीची होते कीं, खरोखरी संपाकाची विपुल सामग्री आपल्या हाताशीं असलेली आपणांला दिसते आणि

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

येणें वाग्यज्ञें तोषावें
महाराष्ट्र साहित्य परिषद

संपाकीपणाहि आपल्या अंगीं असल्याचें आपल्या ध्यानांत येतें. अशा कारणाने आणि या रीतीने आपली आणि आपल्या बरोबरच्या सर्व जनांची क्षुधा-शांति आपणच साधूं शकतों.

४. आमच्या ( परिभाषा-मंडळाच्या ) लहानपणीं दुसरी एक उपयुक्त गोष्ट सांगणारे लोक भेटले. ती अशी की, अहो आंग्लाईमध्येंच ज्या मराठी भाषेचा नवनवीन उदय झाला तिच्यामध्यें ज्या ज्या पारिभाषिक संज्ञा तुम्हांला सांपडतील त्या त्या तुम्ही तशाच घेऊन चालावें म्हणजे तुमचें काम अर्धेमुर्धे सहज आणि चांगलें होऊन जाईल. हाहि पण-समज भ्रममूलकच असल्याचें प्रत्यक्ष त्या वाङ्मयाचें परिशीलन केल्यावर दिसून आलें. या अभ्यासांत अभिजात वळणाची मराठी भाषा कशी वापरावी हें खरोखरच चांगलें समजतें. परंतु शास्त्रीय पारिभाषिक संज्ञा पुष्कळशा आयत्या मिळाल्या नी आपलें आजचें पुष्कळसें काम भागावें असें मात्र त्यांत होत नाहीं.

[ आंग्लाईच्या आरंभीं आरंभीं किती तरी भौतिक शास्त्रें, शास्त्री-पंडित आणि मराठी लेखक यांच्या सहकार्यानें, मराठींत अवतरलीं ! ]

स्वभाषेच्या अध्ययनांतून खरोखर **स्वभाषेच्या अंगचें सहज-स्वाभाविक वळण आणि जनाभिमुखता** हीं घ्यावीं आणि **संस्कृत भाषेकडून ठाकठिकीने व प्रपंचशीलपणे पारिभाषिक संज्ञा बनविण्याचें अभिजात सामर्थ्य** घ्यावें. मग शक्य तितक्या लवकर पण विस्तृत दृष्टि ठेवून, मौलिक भौतिकशास्त्रें कोणतीं तीं ओळखून आणि त्यांचें समाधान-कारकपणें आकलन करून पारिभाषिक संज्ञांची आपली आजची व्यवस्था आपणच विस्तार-पूर्वक करून घेतली पाहिजे. या कामीं **नवीन वसाहत करविणाऱ्यांची विस्तृत दूर दृष्टि** आणि अनाकुल अशी ठाकाठिकीची *संकल्प-प्रकल्प-निकल्पपूर्वक **रचनाचातुरी** आपल्या अंगीं बाणली पाहिजे. तिचा आविष्कार आपल्या निर्मितींत अवश्यमेव झाला पाहिजे ही गोष्ट ठसठशीतपणें मनांत खिंवल्याशिवाय राहात नाही.

५. आधुनिक भौतिकशास्त्रांमध्यें मौलिक किंवा पायाभूत अशीं शास्त्रें कोणतीं ? हें पाहिल्यास "वास्तव-जैव-रसायन-गणितायत्तं हि भौतिकं भवति" असें उत्तर द्यावयास हरकत नाही. वास्तव = physics जैव = Biology रसायन = Chemistry, गणित Mathematics या चार मौलिक शास्त्रांच्या पायावर सर्व आधुनिक भौतिकाची रचना आहे. असें असलें तरी यांत पुनः-" वास्तवं विशिष्यते "-वास्तवशास्त्राचें वैशिष्ट्य आणि मौलिक महत्त्व त्यांतल्यात्यांत परिभाषेच्या दृष्टीनें-असें आहे कीं, त्यांत गणिताचा परिच्छिन्नपणा, (accuracy) काटेकोरपणा, एकीकडे आहे आणि शिवाय वर्णनात्मकतेचा पाया जो कल्पनांचा सुव्याख्यात-पणा ( well-defined nature ) तोही प्रतिपातिदृष्ट्या ( Logically ) ठाम आहे. वास्तव-शास्त्राचें मूलगामित्व, सर्वैकपत्व, सर्वोपकारित्व हें असें आहे.

६. आतां आजमितीला, **महाराष्ट्रांत वास्तवशास्त्राची परिभाषा अद्ययावत्पणा घेऊन सिद्ध झालेली आहे** असें म्हणावयास हरकत नाही. महाराष्ट्र शास्त्रीय परिभाषा मंडळानें हें कार्य गेल्या वीस पंचवीस वर्षांत करून ठेवलेलें असून इतर कित्येक शास्त्रांचाहि पाया, केवळ भौतिकच नव्हे तर कांही विभौतिकांच्या बाबतींत सुद्धां, सुप्रतिष्ठित करून ठेविला आहे. हें करीत असतांना कोणतीं धोरणें ध्यानांत ठेविलीं हें आतां सांगितलें पाहिजे.

---

* संकल्प determination; प्रकल्प planning, project निकल्प estimate.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

(१) मराठी, गुजराथी, बंगाली, हिंदी इत्यादि या सर्व **स्वकीय** भारतीय भाषा होत.

(२) यांतील मराठी ही महाराष्ट्राची **स्वभाषा** (*Swa-bhāshā)

(३) देशी (regional) स्वकीय भाषांपैकीं हिंदी ही भारताची **राष्ट्रभाषा.**

(४) राष्ट्रभाषेसहित सर्व स्वकीय भाषांना आजवर भरपूर पोषण देत असलेली आणि पुढेंहि अपरिमित पोषण देण्यास समर्थ असलेली संस्कृत (अथवा गीर्वाणभाषा) ही आपणां सर्वां भारतीयांची **मातृभाषा** (Feeder language).

(५) इंग्रजी ही एक शास्त्रीय दृष्ट्या समृद्ध आणि समर्थ अशी, आणि शिवाय भारताशीं ऋणानुबद्ध होऊन बसलेली अशी, जागतिक चलनाची, **राष्ट्रान्तरीय** (international) व्यवहाराची भाषा.

(६) आपल्याला प्रथम चिंता स्वभाषेची†. ती समृद्ध आणि समर्थ, (विशेषतः) प्रस्तुत मौतिक शास्त्रीय कार्याकरितां समर्थ, करून घेण्याची. असें असलें तरी आपल्या इतर भाषाभागिनी ज्या गुजराथी, बंगाली, हिंदी इत्यादि, यांना सुद्धां बरोबर घेऊन त्यांच्याशीं सहकार्यानें आपणांस मराठीचें सामर्थ्य आणि समृद्धि साधावयाची आहे.

[ † महाराष्ट्रानें म्हणावें मराठीची, गुजरातनें म्हणावें गुजरातीची, बंगालनें म्हणावें बंगालीची हीच गोष्ट योग्य आणि रीतसर आहे. स्वभाषा स्वकीयभाषांशी अविरोधानें वाढवावयाची, दुसऱ्या भाषेचा विरोध आपल्या भाषेशीं मानावयाचा नाही, आपल्या भाषेचा विरोध दुसऱ्याच्या भाषेला होऊं द्यावयाचा नाहीं, असें करीत करीत देशी भाषा एकमेकींशीं खेळीमेळीनें वागून, पण स्वतःचें सामर्थ्य वाढवीत वाढवीत, मग **एकमेकींमध्यें सामान्य काय आहे, किती असावयास पाहिजे** हें पाहून आवश्यक तेथें देवघेव करूं लागाव्या; **हीच आनंददायक वाढीची रीत साहजिक होय.** ]

मातृभाषा संस्कृत ही सर्व देशी भाषांशीं मातेच्या (वा मातामहीच्या) नात्यानें असल्यामुळें आपलें **प्रधान भाषाधन** शक्यं तोंवर संस्कृतरूप असलें म्हणजे सर्वच भारतीय भाषांचा सहोदय साधण्यास चिंता नाहीं.

हें सर्वसामान्य मौलिक धोरण होय. आतां त्या त्या शास्त्रांत, किंवा पुढें त्या त्या शास्त्राच्या विशिष्ट प्रकरणांत, पारिभाषिक संज्ञा निश्चित करतांना आणि अर्थात् त्या त्या संज्ञेचें क्षेत्र ठरवितांना लक्षांत बाळगावयाचीं धोरणें अशीं.

(१) त्या त्या शास्त्रांतील प्रकरणच्या प्रकरण, एकदम सामग्र्यानें, संज्ञानिश्चिती-करितां हातीं घ्यावें.

(२) प्रकरणामुळें एकमेकींशीं संलग्न, परंतु थोड्या थोड्या अर्थच्छटांनीं एकमेकीं-पासून भिन्न आणि विविध अशा सर्व संज्ञा व्यवस्थितपणें जुळतील, सुसंगतपणें बसतील, असें करावें.

(३) कोणत्याहि प्रचलित भाषेला अनेक अंगें असणें अपरिहार्य असतें हें ध्यानांत ठेवावें. अर्थात् मराठीची (तशीच कोणत्याहि देशी भाषेची) **समृद्धि आणि सजावट या अनेक अंगांनीं झाली पाहिजे.**

---

* हा शब्द इंग्रजींत असाच्या असाच वापरण्यासारखा आहे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

७. भाषा नागरी असते. तशी ती जानपदिक सुद्धा असावी लागते. कांही संज्ञा विशेषेंकरून जानपदिक व्यवहारार्थ असतात; तर कांहीं विशेषेंकरून विद्वद्व्यवहाराकरतांच असतात. कांही संज्ञा कांहीशा सांलापिक (Colloquial) असूं शकतील; तर पुष्कळशा प्रायः ग्रांथिक आणि विद्वज्जनार्थच असाव्या लागतील. अर्थात् विशेष प्रयत्नपूर्वक संज्ञांची निवड नी रचना जी करावी लागणार ती प्रायः नागरी आणि ग्रांथिक व विद्वदर्थीय संज्ञांची हें साहजिकच आहे. सर्वच उपयुक्त शब्द मात्र पारिभाषिक नसतात. पारिभाषिक संज्ञांमध्येसुद्धा निरनिराळे उदाय (निरनिराळ्या लेव्हल्स्) आहेत. वरवरच्या भूमिकांवरील पारिभाषिक संज्ञांच्या अंगीं निराळेच विशेष गुण असावयास पाहिजेत. खालच्या खालच्या भूमिकांवरील संज्ञांच्या अंगीं कांही निराळेच विशेष असावयास पाहिजेत. एकादा शब्द संस्कृतोत्पन्न नाही म्हणून तो अगदी त्याज्यच मानावयाचा हें योग्य नाही. परकीय भाषांतून आलेले शब्द, अपभ्रंश पावलेले शब्द, हे सुद्धा रक्षणीय आहेत. अर्थात् त्यांचें प्राबल्य माजूं देतां कामा नये हें उघड आहे. अनेक दर्जांचे शब्द भाषेला लागतात. त्या त्या भूमिकेवर ते ते बसविले पाहिजेत.

८. विद्वदर्थीय संज्ञा विशेषतः खालील चार कसोट्यांवर पारखून घ्याव्याः—

व्युत्पन्नता (१) च तान्निष्ठा (२) लघुता (३) च प्रपंचिता (४)।
एतच्चतुर्गुणोपेतः संज्ञाशब्दः प्रशस्यते ॥

**तान्निष्ठा :**

एखादी संज्ञा तन्निष्ठ राहणें किंवा तिला तन्निष्ठ करणें हें बरेंचसें संकेतावलंबी आहे. त्या त्या शास्त्रांतील धुरीणांनी एकच संकेत मान्य केला आणि पाळला म्हणजेच ही गोष्ट होऊं शकते. तथापि योजना करण्याच्या वेळीं एका विशिष्ट सुव्याख्यात अर्थाला एक विशिष्ट संज्ञा मिळेल, तीच दुसऱ्या तिसऱ्या ठिकाणीं राबवावी लागणार नाही, अशी योजना करणे आवश्यक होय. वाच्यार्थापासून फारतर एकच पायरी लक्षणेच्या उपयोगाने वापरतां येईल; यापेक्षा लक्षणेचा प्रसर अधिक पुढे जाऊं नये अशीच योजना ठेवावी. एका अर्थाला एक संज्ञा आणि एका संज्ञेला एक अर्थ— ही निष्ठा ठेवणें.

**लघुता :**

प्राथमिक संज्ञा, होतां होईतो, दोनअक्षरी किंवा तीनअक्षरी असावी.

अर्थातच प्रत्ययाने किंवा समास केल्यामुळें बनलेली असल्यास मात्र, ती जरा मोठी झाली असली तरी चालेल.

**प्रपंचिता :**

संज्ञा लघु म्हणजे सुटसुटीत असली म्हणजे बहुधा ती प्रपंचशीलहि असते. धातूंना उपसर्ग लावून अर्थभिन्नता, अर्थविरोध, अर्थगांभीर्य इत्यादि फरक घडवून आणतां येतात. निरनिराळे प्रत्यय लावून कर्तृवाचकें, करणवाचकें इत्यादि अनेक उपयुक्त शब्द एकाच मूळ शब्दापासून करून वापरतां येतात. नामापासून विशेषणें, वा विशेषणांपासून नामें, करतां येतात. नामांपासून वा विशेषणांपासून क्रियापदें बनवितां येतात. कित्येक कृदन्तेंहि नामाप्रमाणे उपयोगी पडतात. एका जातीच्या शब्दांपासून निरनिराळ्या जातीचे किंवा तत्संलग्न निरनिराळ्या अर्थांचे शब्द तयार करतां येणें याला प्रपंचिता म्हणतां येतें.



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

व्युत्पन्नताः

सगळ्यांत महत्त्वाची गोष्ट अशी की पारिभाषिक संज्ञा व्युत्पन्न असावी. म्हणजे ती व्याकरणाला धरून असावी, आणि अन्वर्थक असावी. तिची फोड करून आपणाला असें दाखवितां आलें पाहिजे कीं विवक्षित अर्थबोध ती करूं शकते. याला जितके कमी अपवाद राहतील तितके बरे. कांहीं अपवाद राहातील, पण एकंदरींत ते थोडे असावे.

९. वरील सर्व मुद्दे संक्षेपतः सांगावयाचे तर अशा रीतीने सुटसुटीतपणे सांगतां येतील —

१. स्वभाषयैव सर्वेषां बोधायनमनुत्तमम्. Nothing like स्वभाषा as the medium of instruction.

२. वागर्थौ नित्यसंपृक्तौ विचारप्रतिपत्तये. The sense and the word closely bound up together—that will make for clear thinking.

३. सुखं व्याससमासाभ्यां अर्थवाहः प्रवर्तते. By graceful condensation and expansion—you put your meaning across.

४. व्यासार्थे प्राकृतं युक्तं समासार्थे तु संस्कृतम्. Prakrit for expansion and Sanskrit for compactness — Swabhasha needs both.

५. अनुयायाद्विवेकेन रीतिं सौवर्णमध्यमाम्. Technical and scientific terms amidst plenty of ordinary simple speech — that should be the golden rule to follow.

६. वास्तवं गणितं चैव जैवं चापि रसायनम्।
प्रयुक्तवाङ्मये सिद्धं मूलाक्षरचतुष्टयम् ॥

For the language of the applied sciences (like Engineering) Physics, Chemistry, Biology and Mathematics are the essential ingredients.

७. शोभना च समर्था च स्वभाषा मातृभाषया. Marathi, Hindi etc. are Swabhāshas & Sanskrit is our Matṛibhāsha. Swabhasha, strengthened and set off by Matribhasha, will certainly take you through.

८. व्युत्पन्नता च तन्निष्ठा लघुता च प्रपंचिता। एतच्चतुर्गुणोपेतः संज्ञाशब्दः प्रशस्यते ॥
The best technical term (i) is well-formed (ii) is bound up with one particular sense, its own (iii) is never cumbrous, and (iv) can yield enough derivatives.

१०. आता एकच गोष्ट विशेषेंकरून सांगितली पाहिजे. ती जणूं महाराष्ट्र सरस्वतीच स्वतः सांगत आहे. लेखकहो, तुम्ही महाराष्ट्र सारस्वताचें भौतिक दालन सजवूं म्हणतांना ? मग अगोदर असें पाहा की


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

१. आपल्याला मराठी वळणाची, खऱ्याखुऱ्या मराठी वळणाची, भाषा लिहितां येते ना?

२. आपल्या संस्कृत परंपरेशीं आपण समरस झाल्याबद्दल आत्मप्रत्यय आपणांस वाटतो ना?

३. नुसतें भाषान्तर आपल्याकडून केलें जात आहे अशी गोष्ट नसून, खरोखर चांगलेंच आत्मसात् केलेलें आपल्या विषयाचें आपलें ज्ञान स्वभाषेंत वाङ्मयधारा रूपानें प्रकट होत आहे ना?

---

## भुक्या माझिया मनीं—

सांजवात लागली चहुकडे सांज निघे उजळुनी
'शुभंकरोति' ध्वनी मधुर ये गेहागेहांतुनी
किलबिलाट हा गोड चालला आतां शेजी-घरीं
गुंजन जणुं करितात उद्यांची उषा अरुण हांसरी
घराघरांतुन दीप तेवते; सरेल काळी निशा
उज्ज्वल होतिल उषागमानें खचित उद्यां दशदिशा
सुखावली ही वसुधा माता, उदासीन मी परी
दाटुनिया हुरहूर येतसे निराश माझ्या उरीं
घरटें माझें-हाय! -रिकामें, सांजवात कोठली?
काळोखाची स्वारी तेथें तळ ठोकुनि बैसली
'शुभंकरोति' ध्वनी कोठला? कुणा उराशीं धरूं?
चिवचिवाट ऐकेन गोड, ही आशा हृदयीं करूं?
चिमण्या चोचीमधें देउ मी चिमणा चारा कुणा?
थोपटुनी मग निजवायाला गाउ कुणाच्या गुणा?
स्नेहशून्य वैराण जीवनीं सूत्र एकलें जळे
धूर भरुन राहिला चहुकडे, जीव सदा तळमळे
सांजवात मंगला शोभती सदनासदनांतुनी
येत परीं काहूर उसळुनी भुक्या माझिया मनीं

(सौ.) शांता शर्मा

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# ज्ञानेश्वरीच्या चार पाठ-परंपरा

लेखक—
कै. गोविंद कृष्ण मोडक

## ( उत्तरार्ध )

**१७. विविध प्रतींचे विशेष**— (क) **एकनाथी** प्रतींतील पाठांतरांवरून दिसतें की, (१) एकनाथाने व्याकरणरूपें निवडून स्वकालानुसारी ठेविलीं ( ७९, १४० ). (२) वाचकांस शीघ्र अर्थबोध व्हावा, यासाठी मूळ पाठ बदलून तदर्थक सोपी शब्दयोजना केली ( २०७ ). (३) वाचकांस दुर्बोध असे शब्दप्रयोग टाळण्यासाठी ऐतिहासिक दाखलाहि बदालिला ( २०० ).

**ज्ञातव्य**—(१) पाठ बदलून सोपी शब्दयोजना किंवा ऐतिहासिक दृष्टांतांत बदल या गोष्टी एकनाथांनीच केल्या असाव्या. त्या करण्याचें विद्वत्त्व **तं – १** –च्या लेखकाचे अंगीं दिसत नाहीं. (२) **तं – १** – ने एकनाथींची नकल केली ती अत्यंत अशुद्ध केली असल्याने असें म्हणणें उपपन्न होईल की, शुद्धीकृत **तं-१=एकनाथी**. यावरून अर्थात् असें म्हणतां येईल की, एकनाथी प्रतच तं-१-च्या रूपाने आपणांजवळ आहे. **तं-१** शुद्ध केली की, एकनाथी झालीच. (३) एकनाथी प्रत एकनाथांबरोबरच लय पावली असावी. (परिच्छेद १५).

(ख) **तं-१** हिचा लेखक फारच अज्ञ दिसतो. त्याने फरक केले किंवा त्याचे हातून झाले ते पुढील दोनच प्रकारांनी– (१) शब्द अत्यंत अशुद्ध लिहिणें (९८), व (२) क्वचित् स्वकालीन रूप आदर्शगत रूपाचे स्थानीं योजिणें (४०). (२) इ-प्रत **तं-१-**ची शुद्धीकृत प्रतिकृति होय.

(ग) इ-कोष्टक सांगतें की, (१) तं-१-चें लेखन अशुद्ध आहे; व त्यामुळे (२) कांहीं ठिकाणीं अर्थच लागत नाही. ही दुहेरी अडचण इ-मध्ये दुरुस्त केलेली दिसून येते (७९, ९८, २०७). यावरून **शुद्ध सार्थीकृत तं-१= इ.**

(घ) **रा सं १ = इ** –तुल्यप्राय.

**ज्ञातव्य**–(१) **रासं-१** ही प्रत **सि**–नंतरची असूनहि तिने **सि** हा आदर्श घेतला नाही; यावरून उघड होतें की, (२) **सि**-च्या उत्पत्तीनंतर **सि** आणि (एकनाथी अथवा) **इ** हे दोन्ही आदर्श लेखकांकडून यथारुचि घेतले जात असत.

(ङ) **सि**-चा लेखक स्वतंत्र विचाराचा असल्याने त्याच्या प्रतींत पुढील विशेष आढळतात-(१) स्वकालीन रूपांचा प्रवेश (४१), (२) शब्दांचें सार्थीकरण व सुबोधीकरण (९१, १३८, १६९), (३) अर्थ खुलविणारी वाक्यरचना (७२).

**ज्ञातव्य**–अनेक ठिकाणीं (२५, २००, २०७, २१२) **सि**-ने **इ**–हा आदर्श घेतला आहे.

(च) **शा**-चा लेखक व्याकरणाचा अभिज्ञ दिसतो (२५, १३४). तो **सि-पोथी** 'ही यथाज्ञानेश्वरोक्त असावी' या कल्पनेने आदर्श म्हणून स्वीकारितो; पण प्रत्यक्षांत प्रायः तो



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

इ-चेंच अनुसरण करितो. उदाहरणार्थ, त्याने सि-मधील (सुबोधासाठीं केलेल्या) स्वैर पाठभेदांचे स्थानीं इ-मधीलच पाठ ठेविले आहेत. (९१, १३८, १६९).

१८. (क) तं-१ विरुद्ध इ—एकनाथी ज्ञानेश्वरीची जवळच्या काळांतील नक्कल तं-१. पण ती अत्यंत अशुद्ध असल्याने ती एकनाथीचा प्रतिनिधि होऊं शकत नाही. इ-प्रत तं-१-च्या पाठची प्रतिकृति. तिच्या लेखकाने तं-१-वरूनच प्रत केली; म्हणूनच त्यास वेचिजैल (परिच्छेद १५) असें पाठांतर करावें लागलें. एकनाथी पोथी आदर्श म्हणून त्यास मिळती तर, त्याने 'शेषीं जाइल' असाच पाठ ठेविला असता. याप्रमाणे तं-१-ची शुद्धीकृत प्रत म्हणजेच इ असल्याने, अर्थात् लेखनशुद्धि आणि एकनाथकालासन्नता या दोन्ही लाभल्यामुळे, इ-प्रत लोकांत एकनाथी-प्रतिनिधि म्हणून गणण्यांत आली आहे. तं-१-चीं सर्वच अशुद्धें इ-चे लेखकास उलगडलीं असतील, असें म्हणतां येत नाही. कांहीं तशींच राहिलीं असतील (२५), व कांहींचे ठिकाणीं इ-ने नवीन पाठभेद कल्पिले असतील (२१२). अशीं मोजकीं ठिकाणें सोडिल्यास इ-प्रत ही एकनाथीच म्हणतां येईल. असो. अशा स्थितींत एकनाथाचा प्रशिष्य व इतरहि कांही लोक इ हा आदर्श न घेतां सि-च्या प्रतिकृति कां करूं लागले ?

(ख) इ-विरुद्ध सि— सि-च्या धोरणदर्शक ओवीवरून 'ती साक्षात् ज्ञानेश्वरीची अखंड परंपराप्राप्त शुद्ध प्रतिकृति असावी' असा समज अनेक लेखकांचा झाला. यामुळे त्यांनी 'ज्ञानेश्वरोक्त ज्ञानेश्वरीचा यथामूल अवतार' म्हणून तिचें स्वागत केलें. एकनाथी-प्रत ही कांही झालें तरी 'पाठांतरीं अवद्ध अशा ज्ञानेश्वरीचें कालभेदाने अन्यथाभुत रूपांतर' याप्रमाणे सि-च्या घोषित धोरणानुसार एकनाथानुयायी व इतरहि कांही विद्वान् यांनी एकनाथीचे स्थानीं सि-चा स्वीकार केला; पण यांनीहि प्रत्यक्ष प्रतिकृति-लेखनादि व्यवहारांत सि—मधील स्वैर पाठभेद टाकून (९१, १३८, १६९) तत्स्थानीं एकनाथीप्रतिनिधिभूत इ-चेच पाठ घेतले. यावरून उघड होतें की, (१) लोकांत प्रायः एकनाथी-प्रतिनिधि इ हीच ज्ञानेश्वरीचा आदर्श मानिली जात होती. (२) सि-आदर्श घेणारेहि लेखक वारंवार इ-कडेच वळतात. (३) सि-च्या घोषित धोरणाने न फसलेले विवेकी लेखक अर्थात् इ-चाच आश्रय सर्वथा करितात, हें सांगणें नकोच.

१९. सि-ची आदर्श प्रत कोणती ?

येथवर चर्चिल्याप्रमाणे एकनाथादिकांनीं यथारुचि स्वीकारिलेल्या धोरणानुसार उपलब्ध ज्ञानेश्वरी-पोथीस संस्कार केले. हे संस्कार धोरणाच्या विविधतेमुळे अनेक व परस्पर भिन्न होते. अशा या संस्कारित पोथ्यांच्या प्रतिकृति एकनाथादिकांच्या अनुयायांनीं केल्या. यांत संस्कारित पोथी व तिच्या प्रतिकृति, या मिळून एकेक पाठपरंपरा सिद्ध झाली. अशा या मुख्य पाठ—परंपरा चार आढळतात.

२०. पाठपरंपरा— (१) ज्ञानेश्वरांनीं गीताटीका तोंडीं सांगितली व ती सच्चिदानंदबाबांनी लिहिली. येथे वक्ता अथवा कर्ता ज्ञानेश्वर हे होत. ईश्वर=नाथ. यावरून या पोथीचा कर्ता (ज्ञानेश्वर=) ज्ञाननाथ असेंहि आपल्या सोयीसाठी म्हणतां येईल. (२) ज्ञानेश्वरीच्या पाठांतरें अनेकरंगी रूपें घुसल्यामुळे ती संशोधून त्यांतील स्वकालीन रूपें ठेवून एकनाथाने रूपांची एकविधता साधिली. या रूपांनी युक्त अशी पोथी म्हणजे एकनाथी-प्रत होय. (३) सिद्धनाथाने एकनाथाप्रमाणेच मिळालेल्या पोथ्यांवरून, विशेषतः अर्थबोधास

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

उपकारक असे पाठ ठेविले किंवा केले; व कांहीं ठिकाणीं शब्द व विधानें यांतहि बदल केला. अशा रीतीने त्याने ज्ञानेश्वरीची प्रत स्वमतें सुधारिली. (४) अर्थबोधासाठीं म्हणून भावेकडे होऊं लागलेलें विद्वानांचें दुर्लक्ष नाहींसें करून ज्ञानेश्वरी-भाषा फिरून ग्रंथांत प्रतिष्ठापित करण्याच्या इच्छेने गोपालाश्रमस्वामीने विश्वनाथाच्या नगरींत ( =स्थानीं ) बसून ज्ञानेश्वरीची प्रत यथामूल करण्याचा यशस्वी प्रयत्न केला. पुढे हीच प्रत दिवंगत विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनी महाप्रयासाने मिळवून संपादिली.

वरील प्रतींच्या त्या-त्या विशेषांच्या अनुरोधाने (१) कार्यास अनुलक्षून पहिल्या प्रतीस आपण **ज्ञाननाथी** म्हणूं. (२) दुसरीस संशोधकाच्या नांवाने **एकनाथी** हें नांव आहेच. (३) तिसरी सुधारकाच्या नांवावरून **सिद्धनाथी** ठरते; आणि (४) चौथी लेखनस्थान किंवा संपादक यांच्या नांवांवरून सहजच **विश्वनाथी** होते. अशा रीतीने ज्ञानेश्वरीच्या चार परंपरांच्या मूळ पोथ्या क्रमाने ज्ञाननाथी, एकनाथी, सिद्धनाथी आणि विश्वनाथी ठरतात. या प्रतींच्या अस्तित्वकालाचा विचार येथेच केल्यास बरें.

**२१. प्रतींचे उदयास्त**—(१) ज्ञाननाथी प्रत १२१२-मध्ये लिहिली. ती एकनाथास प्रायः मिळाली नसावी. ती मिळती तर **पाठांतरीं शुद्ध**-ची अवद्ध झालेली अशी प्रत **संशोधण्याचा** प्रसंग त्यास आला नसता. एकनाथी संशोधन १५०६-मध्ये घडलें. जेथे एकनाथास १५०६-मध्ये ज्ञानेश्वरीची **यथामूल** प्रत मिळाली नाही, तेथे सिद्धनाथास १५७२-मध्ये ती मिळणें सुतराम् अशक्य आहे. यावरून १२१२ ते साधारणतः १५०० हा ज्ञाननाथीचा जीवनकाल ठरतो. (२) एकनाथी प्रत १५०६-मध्ये सिद्ध झाली. तींत उपलब्ध प्रतींतून कांहींत तरी अवश्य असलेला, '**शेषीं जाइल**' असाच अर्थयुक्त पाठ एकनाथाचे हातून उतरिला गेला असला पाहिजे. **सेशिंजैल** असा भलताच अर्थशून्य पाठ त्यांचे हातून लिहिला जाणें शक्य नाही. हा पाठ तं-१ ने एकनाथीची नक्कल केवळ **श्रुतलिखित** केल्यानेच उत्पन्न झाला, हें निश्चित. हा पाठ १५५१-मध्ये इ-चे लेखकास सहजच अर्थशून्य वाटला. त्याचे स्थानीं एकनाथी प्रतींतून '**शेषीं जाइल**' हा अर्थवान् मूळ पाठ त्याने अवश्य ठेविला असता. पण हें घडलें नाही. संदर्भानुसार त्यास '**चेचिजैल**' असें शब्दांतर योजावें लागलें. यावरून स्पष्ट होतें कीं, त्याचे वेळीं एकनाथी प्रत नष्ट झाली होती. एकनाथांचा निधनकाल १५२१ हा होय. यावरून स्थूलतः असें म्हणतां येईल की, एकनाथी प्रत कार्याबरोबरच नष्ट झाली. अर्थात् एकनाथीचा उदयकाल शक १५०६ आणि अस्तकाल १५२१ हा ठरतो. ( ३ व ४ ) सिद्धनाथीचा उदयकाल १५७२ आणि विश्वनाथीचा १६३२ हा होय. या दोन्ही प्रती विद्यमान आहेत.

**२२. ज्ञानेश्वरी-परंपरांविषयी कांहीं तौलनिक विचार**—(क) (१) ज्ञानेश्वरांनी ग्रंथ तोंडाने सांगितला व तो सच्चिदानन्दबाबांनी हाताने लिहिला. यांत ग्रंथाचा जन्मच झाला असल्याने पाठभेदाचा प्रश्नच संभवत नाही. (२) एकनाथांना पाठांतरीं दुर्बोध झालेल्या प्रती मिळाल्या. याच प्रती, मूळ ज्ञानेश्वरी न मिळाल्याने, त्यांनी संशोधिल्या; म्हणजे त्यांत स्वकालीन अर्थी, अर्थात् एकविध रूपें ठेविलीं. या प्रतीची कालतः पहिली प्रतिकृति तं-१, व तीवरून केलेली दुसरी प्रतिकृति इ. पैकी तं-१ अत्यंत अशुद्ध असल्याने, इ प्रत एकनाथीची वारस प्रतिकृति म्हणून गणिली जाते; मात्र हींमध्येहि, जेथे तं-१-मधील अशुद्धें तिला उलगडलीं नसतील, तेथे एकनाथीहून भिन्न पाठ असण्याचा दृढ


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

संभव आहे. (३) सिद्धनाथ 'एणेंचि गुरुसंप्रदायें अनुगृहीतु' इ० ओवींत ध्वनित करितात की, 'सच्चिदानंदबाबांनी लिहिलेल्या ज्ञानेश्वरीची, अविच्छिन्न गुरुशिष्यपरंपरेने करण्यांत आलेली, शुद्ध व अविकृत अशी प्रतिकृति मला मिळाली व मीं तिची नक्कल स्वतः केली. ती ही माझी प्रत होय.' पण ही नक्कल त्यांनी यथादृष्ट न करितां, तींत सुबोधतेसाठीं बुद्धिपूर्वक पाठभेद केले. अर्थात् वर वर्णिलेलें स्वतःच्या प्रतीचें स्वरूप त्यांच्या प्रत्यक्ष प्रतिकृति-लेखनांत उतरलें नाही. या त्यांच्या लेखनांतील प्रवर्तक धोरण असें सांगतां येईल—रूपें स्वकालीन ठेवून । शब्द सुपरिचित योजून ॥ केली प्रति जिया अर्थाचें बोधन। सुखें करून, होये ऐशी ॥ या धोरणानुसार ही प्रत अर्थबोधास उपयुक्त असली तरी भाषाभ्यासास अनुपयुक्तच होय. (४) गोपालाश्रमाने उपलब्ध पोथ्यांतून ज्ञानेश्वरकालोचित रूपें घेऊन आपली प्रत सिद्ध केली. ही प्रायः यथामूल झाली असून भाषाभ्यासास विशेष सहाय्यभूत आहे.

(ख) **ज्ञानेश्वरांनी** ज्ञानेश्वरी निर्मिली. ती न मिळाल्याने, **एकनाथांनी** पाठांतरांनी दुर्बोध झालेल्या तिच्या अनेक प्रतींतून स्वकालीन रूपें ठेवून आपली प्रत तयार केली. इ-प्रत या एकनाथी प्रतीचें प्रायः प्रतिबिंब आहे. ज्ञानेश्वर-मठांतील परंपराशुद्ध पोथी मिळवून **सिद्धनाथाने** तींत स्वैर पाठांतरें केलीं. **सि**-चा आदर्श त्याचे म्हणण्या-नुसार 'परंपरागत यथामूल शुद्ध पोथी' मानून कांही विद्वानांनी तिचा स्वीकार केला. पण तींतील स्वैर पाठांमुळें त्या-त्या स्थळीं त्यांना **सि** सोडून एकनाथीचाच म्हणजे इ-चा आश्रय करावा लागला. **गोपालाश्रमाने** रूपांच्या गलबल्यांतून आपल्या विद्वत्ताश्रित अभ्यासाने ज्ञानेश्वरकालीन रूपें निवडून त्यांनी युक्त अशी आपली प्रत सिद्ध केली.

( ग ) आपली प्रत सिद्ध करण्यांत (१) **एकनाथांची** सामग्री पाठांतरांनीं युक्त अशा ज्ञानेश्वरीच्या अनेक पोथ्या. (२) **सि**-ची सामग्री **त्याच्या सांगण्याप्रमाणे** पारंपरीण शुद्ध अशी ज्ञानेश्वरीची प्रतिकृति. हिला सिद्धनाथकृत पाठभेदांनी यावच्छक्य आधुनिक रूप आलें आहे. (३) **गोपालाश्रमाची** सामग्री एकनाथाप्रमाणेच अनेक भिन्नभिन्न पाठयुक्त पोथ्याच होत. त्यांतून त्याने ज्ञानेश्वरकालीन पाठ निवडून घेतले आहेत. **सुखबोधार्थ** एक-नाथांनी स्वकालीन रूपें ठेविलीं. तदर्थच **सि**-ने स्वकालीन रूपें व शब्दहि ठेविले. उलट-गोपालाश्रमाने रूपें व शब्द ग्रंथकालीन **भाषा राखण्यासाठीं** ज्ञानेश्वरकालीन योजिले.

( घ ) **मूल ज्ञानेश्वरी** एकनाथास मिळाली नव्हती. **एकनाथी प्रत** इ-चे लेखकास किंवा सिद्धनाथासहि प्राप्त झाली नव्हती. मूळ ज्ञानेश्वरीच्या पाठांतरयुक्त नकला एकनाथास मिळाल्या; तर **सि**-ला **त्याच्या सांगण्याप्रमाणे** मूळ ज्ञानेश्वरीची अविच्छिन्न-परंपरा-शुद्ध प्रतिकृति मिळाली.

( ङ ) ( १ ) **तं २, पा ट २, भार** आणि रा या चार **गोपालाश्रमस्वामीच्या** प्रतीच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष नकला होत. (२) **सिद्धनाथी** पोथी आदर्श म्हणून सांगणाऱ्या पोथ्या अर्थात् **सि**-च्या प्रतिकृति होत. (३) एकनाथी ओव्या ज्या प्रतींतून नाहींत त्या **मूल-ज्ञानेश्वरीच्या** परंपरित ( विकृत ) नकला होत. (४) ज्या पोथ्या एकनाथी ओव्या धारण करीत असून आपणांस अन्य पोथीच्या अनुयायी म्हणवीत नाहींत, त्या **एकनाथी**च्या प्रति-कृति होत.

येथे चार परंपरा वर्णिल्या. यांहून निराळी अशी पांचवीहि परंपरा प्रचारांत आढळते.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

२३. **अ-नाथी परंपरा–एकनाथी** प्रत नष्ट झाल्यानंतर पूर्वी होऊन गेलेल्या तिच्या नकलांच्या नकला, तशाच सि-प्रतीच्या नकला लोकांत करण्यांत येत होत्या. परंतु या सर्व नकलांतून मुळाचें एकनिष्ठ अनुसरण करण्यांत येत नव्हतें. हीच प्रवृत्ति मुद्रित प्रतींतून अधिक वृद्धिंगत झालेली आढळते. श्री. माडगांवकरांनी खरोखरीच प्रयत्नपूर्वक मोठ्या सायासाने अनेक प्रती मिळवून, पाठांतरें कसोशीने देऊन, ज्ञानेश्वरीची प्रत काढिली आहे. ही त्यांची कामगिरी अत्यंत प्रशंसनीय आहे. परंतु या प्रतींत कोणतीच एक लेखी प्रत आदर्श धरिलेली नाही. ज्या प्रतींत जो पाठ संपादकांस योग्य वाटला त्या प्रतींतून तो पाठ स्वीकारण्यांत आला; व इतर पाठ खाली तळटीपांत दिले आहेत. यामुळे ही प्रत कोणत्याच परंपरेची ठरत नाही. याशिवायहि अनेक प्रती मुद्रित झाल्या आहेत. पण त्यांतहि एक परंपरा अनुसरिलेली नाही. लेखकाचे कंठगत पाठ, स्वकालीन शब्दांचीं रूपें, अर्थ न उकललेल्या स्थानीं शब्द-भेद, स्वतःस पसंत पडलेले इतर पोथ्यांतील पाठ, तत्काल स्फुरलेल्या कवित्वाच्या मोहाने स्वप्रणीत ओव्यांची ज्ञानेश्वरी-ओव्यांत गल्लत, इत्यादि अनेक कारणांनी बहुतेक मुद्रित प्रती परंपरेच्या संबंधांत संकीर्ण वा अ-नाथी आहेत. **अनाथी**=कोणताहि आदर्श वा नायक म्हणून मूल प्रत जीस ग्राह्य नाही अशी. **ज्ञानेश्वरी-संहिता** म्हणजे एक मृदु-व्यवहार्य व यत्न-संधार्य अशी मूल्यवान् वस्तु आहे, ही जाणीव त्यांचे ठिकाणीं दिसत नाही. नकलतांना ज्ञानेश्वरोक्त शब्द जपून हाताळावयाचे, ते अक्षत कायम राखावयाचे, त्याच्या रूपांत बदल करावयाचा नाही, अशी जपणूक यांनी केलेली आढळत नाही. अन्योन्य-भिन्न पाठ धारण करणाऱ्या अशा या प्रतींतील कांही प्रती आपणांस विशिष्ट परंपरेच्या म्हणवितात. पण मूळ ज्ञानेश्वरी जर एक, तर तिचे पाठ सर्व एकविधच असले पाहिजेत. त्या-त्या परंपरेनुरूप फरक झालाच तर ओव्यांचा **अर्थ** करण्यांत होईल. **पाठांत** म्हणजे मूळ संहितेंत होणार नाहीं. असें असतां या परंपरावादी आवृत्तींत पाठ निरनिराळे सांपडतात. अर्थात् या पाठांतील भेदास मूलाचा आधार नाही. या परंपरांत 'ज्ञानेश्वरीची संहिता केव्हांहि एकच असली पाहिजे,' या तत्त्वाचें उल्लंघन कसें घडलें ?

मूल-ज्ञानेश्वरी-निर्मितीनंतर लोटलेल्या सहा-सात वर्षशतकांत भाषेंत, शब्दांच्या रूपांत हळूहळू फरक पडत गेले. निसर्गतःच असे फरक पडावयाचे. या दीर्घ काळांत केल्या गेलेल्या प्रतिकृतींतून या फरकांचें प्रतिबिंब, लेखकाला कळत वा नकळत, अवश्य उमटावयाचें. या-मुळे या प्रतींतून ज्ञानेश्वरी-संहिता बदलत गेली. मुद्रणकालापूर्वी प्रायः कोणत्या तरी एका परंपरेची पोथी पुढे ठेवून तदनुरूप प्रतिकृति करण्यांत येई. तरीपण तींत अनेक ठिकाणीं लेखकाकडून, सदिच्छेनेच कां होईना, विविध कारणांनी बदल करण्यांत येई. यामुळे कोण-तीहि प्रतिकृति कृतीहून कांही तरी अंशांनी निराळी होई. तथापि हा निराळेपणा मर्यादित असे. अलीकडे मुद्रणकालीं ज्ञानेश्वरकालापासून लोटलेल्या दीर्घतर अंतरामुळे शब्दरूपांत अधि-कच बदल झाले आहेत. हे बदल मुद्रित आवृत्तींत सहजच शिरले. शिवाय अनेक प्रती जम-विणें ही गोष्ट हस्तलेखनकालापेक्षा अलीकडील मुद्रणकालांत दळणवळणाच्या वाढत्या सोयीं-मुळे सुकर झाली आहे. तुलनार्थ जमविलेल्या या प्रतींच्या आधिक्याने अर्थातच अनेक परंपरांतील पुष्कळच पाठभेद या आवृत्तींत घुसले. यामुळे लेखी प्रतीपेक्षा मुद्रित प्रतींत कोणत्याहि एका परंपरागत पोथीचें अनुसरण फार कमी आढळतें. ( हा प्रकार माडगांवकर-प्रतींत आपण पाहिलाच.) म्हणून अलीकडील आवृत्त्यांची परंपरा संकीर्ण किंवा अ-नाथी ठरते.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अशा रीतीने वरील ज्ञाननाथी इत्यादि चार परंपरांमध्ये या पांचव्या **अ-नाथी परंपरेची** भर पडली आहे.

**२४. पाठभिन्न संहिता कशी शुद्ध करावी ?**— ज्ञानेश्वरीच्या मूळ लेखनकालापासून लोटलेल्या प्रदीर्घ कालावधींत झालेल्या प्रतिकृतींतून लेखकांनी तत्तत्कालानुरूप शब्दांचीं भिन्नभिन्न रूपें लिहिलीं आहेत. हीं रूपें भिन्न होऊं न देण्याचा पुढील उपाय आहे. तो म्हणजे मूळ ज्ञानेश्वरीच्या भाषेवरून निघालेल्या ' व्याकरण–नियमांचें एकनिष्ठ अनुसरण. ' हे नियम नीट समजून घेतल्यास, समोर असलेल्या वा सुचलेल्या रूपांतील कोणतें रूप मूलगत ज्ञानेश्वरोक्त, हें निश्चित ठरवितां येईल; व हेंच ठरविलेलें रूप लेखकाच्या प्रतिकृतींत लेखारूढ होईल. **सारांश**–मूळ ज्ञानेश्वरीसंहितेवरून व्याकरणनियमानुसार असलेलेंच रूप योजणें, हा लेखकाचा आग्रह असला पाहिजे. यानेच ज्ञानेश्वरीच्या संहितेंत रूपबदल होणार नाही. हीच गोष्ट उदाहरणाने विशद करूं.

**२५. पाठशुद्धींत व्याकरण-ज्ञानाचें महत्त्व**—' जाणतेन गुरू भजिजे ' अशा रूपाचा मूळचा चरण आहे. यामध्ये **'जाणतेन'** हें रूप बरोबर न वाटून, तेथे **' जाणतेनो '** असें सारखें दिसणारें रूप असावें, असें स्वकालीं प्रचारांत असलेल्या संबोधनरूपांवरून लेखकास वाटलें; व तदनुरूप त्याने **'जाणतेन'**-चे स्थानीं **'जाणतेनो'** असें ( आपल्या मतें ) संबोधन ठेविलें, यांत काय दिसतें ? —( १ ) 'जाणतेन' ही तृतीया लेखकाच्या ध्यानांत प्रायः आली नाही. ( २ ) तत्स्थानीं त्यास संबोधन इष्ट वाटलें. ( ३ ) स्वकालीन **'जाणतेनो'** हेंच ज्ञानेश्वरकालींही संबोधनरूप होतें असें त्याने चुकीने गृहीत केलें; व ( ४ ) तदनुसार 'जाणतेन'–चे स्थानीं 'जाणतेनो' हें रूप त्याने लिहिलें. येथे लक्षणीय की, 'शब्दरूपांत कालानुरूप बदल होत जातो' ही गोष्ट त्याचे लक्षांतच आली नाही, त्याचे ध्यानीं-मनींहि नव्हती. ज्ञानेश्वरकालीं नो–प्रत्ययान्त संबोधन मुळीच नव्हतें. अर्थात् त्याचा प्रयोग तें **प्रचारांत नसल्याकाळीं** करणें म्हणजे **कालक्रमभंगाचा दोष** करणें होय. अशा रीतीने व्याकरणाच्या अज्ञानाने कालक्रमभंगमूलक अपपाठ वारंवार उत्पन्न होतात. याच प्रकारचें पुढील उदाहरण विशेष डोळ्यांत भरण्यासारखें आहे. ( ओ. ५५ ) **' ब्रह्मेशानीं** प्रशंसिजे' यांतील पहिला शब्द तृतीया अनेकवचन आहे, हें सर्वमान्य. पण तृतीया कोणत्या शब्दाची, याबंबंधीं मतभेद संभवतो. ( १ ) विभक्ति–प्रत्यय **नीं** घेतल्यास 'ब्रह्मेश' असें मूळ पद निघेल. ( २ ) **ईं** हा प्रत्यय घेतल्यास ' ब्रह्मेशान ' असें प्रातिपदिक ठरेल. यांतील **नीं** प्रत्यय हा **ज्ञानेश्वरांनंतर** बऱ्याच काळाने प्रवृत्त झाला आहे. अर्थात् ब्रह्मेश+नीं=**ब्रह्मेशांनीं** हें रूप योजणें म्हणजे आपलें ज्ञानेश्वरी–व्याकरणाचें व भाषाप्रवृत्तीचें अज्ञान दाखविणें होय. पण चमत्कार असा कीं, ( १ ) आजपर्यंतच्या ( **हर्षे-प्रतींत** उल्लेखिलेल्या ) सर्व **हस्तलिखित** प्रतींत **ब्रह्मेशानीं** असें **एक–अनुस्वार–युक्त, ब्रह्मेशान**-वरून बनलेलें, शुद्ध रूप असतां, ( २ ) आठल्येप्रभृति सर्वच **मुद्रित प्रतींत** ब्रह्मेश-वरून बनलेलें, नीं–प्रत्ययान्त, 'ब्रह्मेशांनीं' असें अनुस्वारद्वययुक्त प्रामादिक रूप आहे. येथे हें उघड आहे की, हे संपादक विद्वान् असल्याने, त्यांना स्वकालीन तृतीया सम्यक् अवगत होती; पण 'कालक्रमानुसार रूपान्तर पावण्याची भाषेची प्रवृत्ति ' त्यांच्या लक्षांत आली नाही. स्वकालीन नीं-प्रत्ययान्त रूपच पूर्वापर चालत आलें आहे, ही त्यांची समजूत व तदनुसार तेंच रूप त्यांनी ( श्री. हर्षे यांनीहि ) ज्ञानेश्वरींत प्रविष्ट केलें. यावरून अभ्यासकांनी असा बोध घ्यावयाचा कीं, पदरूपांत बदल करणारी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

भाषेची प्रवृत्ति ध्यानांत घेऊन, '**ज्ञानेश्वरीचें व्याकरण** आत्मसात् करणें संहिताशुद्धीस अवश्य आहे.'

**२६. व्याकरणाचा पाया—व्याकरण कशावर आधारावयाचें?** अर्थात् ज्ञानेश्वरीवर. पण ती मूळ रूपांत घेतली पाहिजे. हें मूळ रूप, ज्ञानेश्वर-मुखोक्त आज विद्यमान नाही व पुढेहि होण्याचा संभव नाही. तरीपण तिच्याशीं नव्वद टक्के साम्य पावणारी अशी राजवाडे-प्रत आपणांजवळ आहे. हिची मूळ हस्तलिखित प्रत असती तर ती प्रायः मूळ प्रतीचें प्रतिबिंबच असती. तदभावीं रा. प्रतीची पाठची बहीण तं-२ (१६३६) ही हस्त-लिखित प्रत विद्यमान आहे. जरी या पोथीचें कालदृष्ट्या मूल्य रा. प्रतीहून थोडें कमी असलें, तरी तींत पुढील गुण आहे. मुद्रित रा-प्रतींत असंख्य मुद्रणदोष घुसले आहेत, यामुळे ही मुद्रित प्रत तं-२ या लेखी प्रतीहून फारच हीन झाली आहे. करितां वर्तमान-स्थितींत ज्ञानेश्वरी-मुळाशीं यावच्छक्य घनिष्ठ साम्य धारण करणारी पोथी तं-२ हीच होय. म्हणून ज्ञानेश्वरीचे भक्त व मराठीचे अभ्यासक यांनी ही प्रत मुद्रण्याची व्यवस्था करणें उपयुक्त होईल. मात्र तिचें मुद्रण अत्यंत निर्दोष करण्याची दक्षता बाळगिली पाहिजे. अशा या मुद्रित प्रतीवर ज्ञानेश्वरीचें व्याकरण आधारिलें म्हणजे तें निर्दोष होईल व अशा व्याकरणाच्या साह्याने ज्ञानेश्वरी-पाठकांस शुद्ध पाठ ठरवितां येईल व भाषाभ्यासकांसहि यथार्थ ज्ञानेश्वरी-भाषा उपलब्ध होईल.

**२७. अर्थापनांत व्याकरणाचें कार्य**—एखाद्या पद्याची संहिता व्याकरणानुसार बसवितां आली म्हणजेंच, अर्थाच्या संबंधांत अभ्यासकाचें पूर्ण समाधान होतें. एरवीं पद्याचा अर्थ त्यास समाधानकारक वाटत नाहीं. ही अनिष्ट स्थिति अनेक मुद्रित ज्ञानेश्वरीच्या पोथ्यांतून आढळत. उदाहरणार्थ—

जिया उत्तमे कुलिंचिया होती । आणि गुण-लावण्य आथी ॥
तिया आणिकीतें न साहाती । सतेजपणें ॥ (१–१८६).

**वकट-प्रतींतील अर्थ**—ज्या स्त्रिया उच्च कुलांतल्या असून गुण व रूप यांनी संपन्न असतात, त्यांना आपल्या अंगच्या पाणिदारपणामुळे दुसऱ्या स्त्रीचें (= सवतीचें) वर्चस्व सहन होत नाही.

हा अर्थ सामान्यतः बरोबर आहे, पण तो ओवीच्या विद्यमान संहितेंतून निघत नाही. शब्द जरी तेच असले तरी त्यांच्या रूपांत बदल झाल्यास अर्थांतहि बदल होतो. **मांजर उंदीर** आणि **खा** असे तीन शब्द घेऊं व त्यांचीं पुढील वाक्यें बनवूं: (१) मांजर उंदिराला खातें, (२) मांजराला उंदीर खातो. या दोन्ही वाक्यांत शब्द तेच, पण त्यांचीं रूपें निराळीं आहेत व म्हणून अर्थहि निराळा होत आहे. यावरून वाक्यार्थ जसा शब्दांच्या अर्थावर तसा रूपावरहि अबलंबून असतो. विशिष्ट वाक्यार्थास विशिष्ट रूप पाहिजे, हें उघड होतें. एतदनुसार पाहतां, वरील पाठांतून विवक्षित अर्थ सरळपणानें निघत नाही. हीच अडचण अन्वय केल्याने स्पष्टतर होईल. करितां हा अन्वय पाहूं.

**२८. पद्याच्या अर्थापनांत अन्वयाची उपयुक्तता—अन्वय**—जिया उत्तमे कुलिंचिया होती आणि गुणलावण्य आथी तिया सतेजपणें आणिकीतें न साहाती.

या अन्वयवाक्यांत **आणि** हें उभयान्वयी अव्यय आहे. हें अव्यय **सजातीय** असेच घटक जोडितें. हे घटक शब्द, वाक्यांश किंवा वाक्यें असे त्रिविध असतात. प्रस्तुतांत **आणि**

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचणे तोषाचे
महाराष्ट्र साहित्य परिषद

दोन शब्द जोडीत नाही; वाक्यें किंवा वाक्यांश जोडितें, हें उघड आहे. एतदनुरूप (क) पूर्वघटक **वाक्य** घेतल्यास, उत्तर घटक तत्सदृश 'जियां (षष्ठी किंवा सप्तमी अ. व.) गुण-लावण्य आथी' असें विशेषण-वाक्य प्राप्त होईल. पण **जियां**-चे अभावीं हें वाक्य शक्य नाही. (ख) पूर्वघटक वाक्यांश घेतल्यास 'उत्तमे कुळिंचिया होती' या विधेयाचे जोडीस उत्तर घटक 'गुण-लावण्यें आथी' (= गुण व सौंदर्य यांनी युक्त असतात) असा वाक्यांश असेल; पण 'गुण-लावण्यें' अशा तृतीयेच्या अभावीं हाहि विधेय-वाक्यांश संभवत नाही. अर्थात् **आणि** या अव्ययाच्या अर्थाचा येथे निर्वाह होत नाही. येथे पुढील दोन शुद्ध घटना संभवतात—

(१) (क) जिया...होती आणि (ख) जियां गुणलावण्य (समाहार-द्वंद्व) आथी
(येथे 'आणि' दोन विशेषणवाक्यें जोडितें.)

(२) जिया (क) उत्तमे कुळिंचिया होती, आणि (ख) गुण-लावण्यें आथी
(येथें '**होती**' आणि '**आथी**' अशीं दोन विधेयें **आणि**-ने समुच्चित आहेत.

या दोन शुद्ध रचनांपैकी कोणतीच वंकट-प्रतीत नाही. अर्थात् या ओवीची तींतील संहिता चूक आहे. हाच प्रकार विश्वनाथी-वर्ज सर्वच परंपरांतील पोथ्यांचा. विश्वनाथी-पोथ्यांत मात्र वरील दुसऱ्या घटनेनुरूप **गुण-लावण्यें** असें स्पष्ट तृतीयान्त रूप आहे. याच्या साह्याने अर्थ सुरळीत लागतो, हें आपण पाहिलेंच आहे. येथे **शंका**— ओवीचें रूप रा-प्रतीमध्ये व्याकरणशुद्ध कां सांपडावें ? **उत्तर**— गोपालाश्रमांनी परिश्रमपूर्वक डोळसपणें व्याकरणशुद्ध अशींच रूपें आपल्या प्रतींत योजिलीं आहेत. अशा रीतीने व्याकरणशुद्ध रूपांनी अन्वय व अर्थ यांची संगति जमते आणि अभ्यासकाचें मन अर्थाच्या संबंधांत पूर्णतः संदेहमुक्त होतें.

२९. **निगमन**— श्री. हर्षे-संपादित ज्ञानेश्वरीची प्रत ज्या पोथीवरून तयार केली तिचा लेखनकाल, शक १२७२ नसून, १५७२ आहे, हें गणिताच्या साह्याने त्यांतील तिथि-वारांचा मेळ पाहून संशयातीत सिद्ध झालें आहे. तींतील रूपें, शिलालेख, ताम्रपटादि ज्ञानेश्वरसमकालीन रूपांहून भिन्न असल्याने, भाषादृष्ट्याहि १५७२ हाच तिचा लेखन-काल ठरतो.

एकनाथाने ज्ञानेश्वरांपासून त्याच्या कालापर्यंत लोटलेल्या ३०० वर्षांत ज्ञानेश्वरींत शिरलेल्या विविध रूपांतरांपैकी समकालीन रूपें ठेवून वाचकांस ज्ञानेश्वरी सुबोध करण्याचा प्रयत्न केला. पण यांत भाषेच्या ज्ञानेश्वरकालीन रूपांस धक्का लागला. असें न होतां ज्ञाने-श्वरीचें यथामूल रूप लोकांस मिळावें, या दृष्टीने गोपालाश्रमाने अनेक पोथ्या घेऊन त्यांतून संदर्भानुकूल व्याकरणशुद्ध पाठ यथासंभव निवडून काढिले वा कल्पिले, व तद्युक्त प्रत तयार केली. अर्थात् एकनाथ व गोपालाश्रम यांची संशोधनांतील धोरणें सर्वथा अन्योन्यविरुद्ध होतीं. या दोघांतील विरोध दर्शविण्यासाठी वाचकांनी दिलेलें कोष्टक पहावें (परिच्छेद १४). या दोघांच्या संशोधनकालांच्या मध्यभागीं परशराम सिद्धनाथाने एकनाथांप्रमाणेच पण अधिक प्रगत धाडशी प्रयत्न केला. हा प्रयत्न सिद्धनाथ-प्रतीच्या रूपाने आपणांसमोर आहेच. सिद्धनाथाने केलेल्या पाठांतरांची इतरांबरोबर तुलना करण्यास सहायभूत असें कोष्टक मागे दिलें आहे (परिच्छेद ७). त्यावरून सि-चें धोरण अर्थव्यक्तीस किती अनुकूल होतें व

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तितकेंच यथामूलत्वास कसें बाधक होतें, हें दिसून येईल. सिद्धनाथाने एकनाथाच्या घोरणाचा, शब्दांतसुद्धां बदल करून एक प्रकारें अतिरेक केला. म्हणूनच तद्‌विरुद्ध दिशेचा यत्न गोपालाश्रमास करणें भाग पडलें. या वरील तीन विद्वानांच्या खटपटीमुळे वेगवेगळया परंपरा अस्तित्वांत आल्या. मूळ ज्ञानेश्वरांची ( ज्ञाननाथी ) परंपरा धरून एकंदर परंपरा चार झाल्या. पैकी, (१) पहिली परंपरा **ज्ञाननाथी.** हिची मूळ पोथी व तिच्या साक्षात् प्रतिकृति या सर्वच नष्ट झालेल्या दिसतात. (२) **एकनाथी**-ची **तं-१** ही जवळची पण अशुद्धतम अशी प्रत प्रचारांत आहे. **तं-१**–वरूनच लेखकांनी कांही प्रमाणांत शुद्ध करून लिहिलेल्या पोथ्याहि अनेक आहेत. अशांपैकी इ-प्रत बरीच शुद्ध व आसन्नकालीन असल्याने ती बऱ्याच अंशांनी एकनाथीचा प्रतिनिधि मानण्यास हरकत नाहीं. मूळ एकनाथीच्या प्रतिकृति व तिच्याहि प्रतिकृति या लोकांत बऱ्याच पठनांत आहेत. या पोथ्या एकनाथी परंपरेच्या होत. (३) नष्ट झालेल्या एकनाथी-ची अधिकृत वारस असलेली **तं-१** ही प्रत अति-अशुद्ध असल्याने, लेखनशुद्धीची विशेष आवड बाळगणाऱ्या लेखकांनी एकनाथी-प्रत बाजूस सारून सिद्धनाथीच्या नकला करून घेतल्या. या प्रती **सिद्धनाथी**, होत. (४) एकनाथी तशीच सिद्धनाथी, या दोन्ही पोथ्या अर्थासाठी भाषारूपास धका लावण्यास कचरत नाहींत. हें न खपून गोपालाश्रमाने अनेक पोथ्यांच्या तुलनेने **यथामूल** प्रत सिद्ध करण्याचा पूर्णप्राय यशस्वी प्रयत्न केला. या त्याच्या प्रयत्नाचें अभिनंदन भाषाशास्त्राचे अभिज्ञ अशा कांही ज्ञानेश्वरीप्रेमी विद्वानांनी केलें. यांनी तयार केलेल्या गोपालाश्रमाच्या प्रतिकृति लोकांत तीन उपलब्ध आहेत. यांचा आदर्श गोपालाश्रम-प्रत ही विश्वनाथनगरींत जन्मली असल्यानें '**विश्वनाथी**' होय. हीच प्रत राजवाडे प्रतीचें हस्तलिखित मूळ होय, हें म्हणणें सत्यास धरूनच होईल, असें वाटतें. म्हणूनच तसें या लेखांत धरिलें आहे. ही प्रत व तिच्या तीन प्रतिकृति मिळून **विश्वनाथी** परंपरा सिद्ध होते.

वरील चार परंपरागत पोथ्या प्रायः आदर्शास धरून सिद्ध केलेल्या असतात. परंतु अलीकडे झालेल्या मुद्रित प्रति प्रायः, एक आदर्श प्रमाण न मानितां विविध कारणांनी भिन्न-भिन्न परंपरांच्या पोथ्यांची गल्लत करून घातलेल्या संकीर्ण पाठांनी युक्त दिसतात. यामुळे या मुद्रित प्रती ( एक स्वामी, आदर्श किंवा **नाथ** यांचे अभावीं ) **अ-नाथी** वा संकीर्ण पोथ्या होत. यांची परंपरा अर्थात् **अ-नाथी**. या परंपरेंत दिसून आलेली संकराची प्रवृत्ति नष्ट होण्यास व्याकरणाचें ज्ञान उपकारक होईल. त्या ज्ञानाने अनेक रूपांपैकी शुद्ध रूप कोणतें, हें ठरवितां येतें व त्यामुळे पोथींत पाठांची एकविधता साधितां येते. याने सहजच रूपसंकरास आळा बसतो. संहिता व अर्थ यांचा मेळ सशास्त्र बसण्यास अन्वयाची मध्यस्थी उपकारक होते. अन्वय असल्यास अर्थ करितांना एक प्रकारचें बंधन उत्पन्न होतें. व त्यामुळे अर्थ वाटेल तिकडे स्वैर धांव घेत नाही आणि त्यास निश्चित रूप प्राप्त होतें. तेव्हा **संहिता** शुद्ध होण्यास व्याकरणाचा अभ्यास आणि योग्य **अर्थ** लागण्यास अन्वयाचें साह्य उपकारक ठरतें. याप्रमाणे व्याकरणाचें अनुसरण ज्ञानेश्वरीच्या अभ्यासास अत्यंत उपयुक्त ठरेल. त्याने योग्य पाठ निश्चित होतील. असे निश्चित पाठ आयतेच विश्वनाथी-प्रतींत दिलेले आहेत. करितां ज्ञानेश्वरीचा अभ्यास मूलगामी, सशास्त्र व तर्कशुद्ध व्हावा, असें इच्छिणारांनी विश्वनाथीचा अवलंब करणें योग्य होईल.

**म. सा. प. ( २३-१-३ )**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

**३०. पुढे काय ?**—ज्ञानेश्वरीच्या चार परंपरा आपण पाहिल्या. यांतील विश्वनाथीची प्रत अभ्यासास उपयुक्त आहे. ही प्रत म्हणजे दिवंगत विश्वनाथ काशिनाथ राजवडे यांनी संपादिलेली. जुन्यीं भाषेतील लिखाण छापतांना ऱ्हस्व-दीर्घ, अनुस्वार इत्यादींच्या संबंधांत अनेक चुका पदोपदीं संभवतात. अशा चुका राजवाडे प्रतींत भरपूर आहेत. या प्रतींत छापिलेलें मुळांतील आदर्श पत्र आणि त्याची मुद्रित प्रतिकृति यांमध्ये तीन चार ठिकाणीं विसंवाद आहे. अर्थात् या एका पानांत कमींत कमी तीन चुका आहेत. तेव्हा सबंध ८०० पानांच्या पुस्तकांत हजारों चुका संभवतील, हें सांगणें नकोच. या चुका शुद्ध करणें, तर मूळ हस्तलिखित प्रत पाहिजे. पण ती तर अग्निसात् झाल्याने कायमची नष्ट झाली आहे (?). तरीपण तिच्या भागिनी तं-२, पाटं-२ आणि मार या विद्यमान आहेत. करितां यांतील रा-ची बहीण तं-२ ही मुद्रित केल्यास तिच्या अनुरोधाने राजवाडे प्रतींतील चुका दिसून येतील आणि अभ्यासकांस ज्ञानेश्वरी-मुळाच्या अधिक जवळ जातां येईल. माझ्या मतें ही तं-२ प्रत यथावत् मुद्रित केल्यास ज्ञानेश्वरीचें ९९ टक्के यथामूल रूप आपणांस हस्तगत होईल. हें घडण्यासाठी ज्ञानेश्वरभक्तांनी व मराठी भाषकांनी अशी मुद्रित प्रत तयार करावी. या प्रयत्नांत श्री. हर्षे यांचें साह्य लाभल्यास उत्तमच. कारण अशा प्रतींचें 'संपादन कसें करावें, याचें तंत्र त्यांस उत्तम साधतें,' हें प्रस्तुत हर्षे-प्रतीवरून सिद्ध झालें आहे. असो. एतदर्थ ज्ञानेश्वरभक्तांनी आपापल्या परंपरेचा अभिमान सोडून वरील प्रयत्न करणें योग्य होईल. अशा रीतीने सिद्ध झालेल्या प्रतीपासून (१) ज्ञानेश्वरीभक्तांस अदृष्टफललाभार्थ अक्षत मिळालेल्या ज्ञानेश्वरी-पाठांचें पठन शक्य होईल, व (२) जुन्या मराठीच्या अभ्यासकांस तत्कालीन मराठीचा ज्ञानेश्वरीसारखा आदर्श अधिकृत लाभेल. शेवटीं इच्छितों की, हें सत्य सृष्टींत उतरो ! आणि अश्वत्थाम्याचें पचपचीत व निःसार पिठवणी मिळावयाचें बंद होऊन, तत्स्थानीं गोपालकृष्णाचें मधुर आणि सत्त्वसंपन्न असें गो-धारोष्ण, शुद्ध यथामूल ज्ञानेश्वरीची प्रत लाभल्याने, या दोन्ही लोकांच्या मुखांत पडो !

---

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# गोड बोला

लेखक :
प्रा. रा. म. मराठे

संक्रांत होती. 'गोड बोला' या सुभाषिताचा पाऊस पडत होता. वामनाचा एक हितशत्रु त्याला भेटायला आला. हातावर तिळगुळाची वडी ठेवून सुपाएवढं तोंड करून हंसत तो म्हणाला " वामनराव तिळगुळ घ्या गोड बोला. " मी जवळच खुर्चीवर बसलों होतों. लगेच त्या गोडबोल्याकडे अंगुलिनिक्षेप करून वामन मला म्हणाला, " अरे तूं पुस्तकांतला किडा आहेस. पण साकार वाङ्‌मय तुला कधी पहायला मिळालं नसेल. 'A man may smile and smile and be a villain' म्हणून शेक्सपिअरचें वचन आहे ना? त्याचा साक्षात् अवतार तुझ्या पुढे उभा आहे !

वामनरावाच्या फटकळपणाचा नमुना मीं अनेकदा पाहिला होता. तरीहि त्याच्या या सरळ शरसंधानाने मी सर्दच झालों. पण वामनचा दोस्त महा बिलंदर ! मनांत कांहीहि झालें असो, चेहऱ्यावर त्याचा कानोसा लागत नाही. उलट आणखी एकदा तोंडभर हंसून तो मला म्हणाला "वामनरावांचें बोलणें फार मार्मिक ! विनोद करावा तर वामनरावांनींच !" आणि माझ्या हातावर तिळगुळाची वडी ठेवून त्याने मलाहि गोड बोलण्याचा संदेश दिला.

अशा लोकांचें गोड भाषण म्हणजे अभ्यासाने कमावलेली सिद्धि असते. परवंचना आणि आत्महित यांचें अमोघ साधन म्हणूनच ते ह्या अस्त्राचा उपयोग करतात. कटु वचन त्यांच्या मुखांतून सहसा बाहेर पडणार नाही. भरभक्कम हप्त्यांचा विमा अथवा पोकळ कंपनीची भागीदारी तुमच्या गळ्यांत बांधायची असो वा दशकापासून शतकापर्यंतची उसनवारी करावयाची असो, आपल्या मिष्टान्न वाणीने अशी मोहनी तुमच्यावर ते पाडतील की, आपला खिसा कापला जात आहे याचा पत्ताहि तुम्हाला लागणार नाही. परंतु या गोड अवगुंठनाखाली दडलेली कटुता उघडी पडली म्हणजे असल्या वंचक वाङ्माधुर्याची शिसारी येते. 'मधु तिष्ठति जिह्वाग्रे हृदये तु हलाहलम्' या सुभाषिताचा जन्म अशा बोचक अनुभवांतूनच झाला असावा.

व्यवहारांतील हें कटु सत्य जमेस धरलें म्हणजे 'न ब्रूयात् सत्यमप्रियम्' या उपदेशाला नीतितत्वापेक्षां मतलबासिंधूचाच आधार अभिप्रेत असावा याविषयी संदेह उरत नाही. वास्तविक लटकें स्मित आणि भाषणांतील लटकी माधुरी सारखीच तिरस्करणीय असतात. गोड बोलून गळा कापणारापेक्षा सुरीने गळा कापणारा पतकरला ! अशा दांभिक विघातक मधुर भाषणाचा गौरव आणि प्रचार करण्यासाठी आपल्या पूर्वजांनी एक खास सण राखून ठेवावा याबद्दल अचंबा वाटल्यावाचून राहत नाही.

वास्तविक हें गोडगुंजन थोर व्यक्तींच्या पसंतीला कधीच उतरलेलें नाही. कटु भाषण हेंच प्रसिद्ध ग्रीक तत्त्ववेत्ता सॉक्रेटिस याचें वैशिष्ट्य होतें. बाजारपेठेंत थांबून, येणारा जाणाराला छेडून, उलटसुलट प्रश्न विचारून त्याचें अज्ञान व दंभ अनावृत करणें; आणि अशा रीतीने सत्यजिज्ञासा वाढविणें हा व्यवसाय त्या महात्म्याने जवळ जवळ अर्धशतक चालविला. पण या खटाटोपांत जी कटुता निर्माण होई तिच्यांतूनच सॉक्रेटिसाचें मरण ओढवलें. आपलें अज्ञान उघडें पडल्याचा अपमान ज्या क्षुद्र व्यक्तींना सहन झाला नाही त्यांनी सॉक्रेटिसाबद्दल मनांत दंश धरिला. आणि धर्मावतार सॉक्रेटिसावर अधार्मिकतेचा आरोप करण्यांत आला. चौकशीच्या वेळीं सुद्धां सडेतोड भाषणाचें व्रत न सोडल्यामुळे रुष्ट झालेल्या न्यायाधीशांनी


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्याला देहदंडाची सजा फर्मावली. कटु भाषणाच्या अंगीकृत व्रताबद्दल कटु जहर सॉक्रोटिसाने शांतपणें प्राशन केलें.

संत तुकारामालाहि गोड भाषणाचें वावडें होतें. 'बाईल कर्कशा' असल्याबद्दल त्याने देवाला धन्यवाद दिले, आणि 'निंदकाचें घर असावें शेजारीं' अशी प्रार्थना केली. स्वतःच्या कार्याबद्दल तर "निंदावें हें जग ऐसा मागा आला भाग" अशी थोर ग्वाही त्याने दिली आहे. लोकांचे दोष दाखविण्यांत, त्यांचा दंभस्फोट करण्यांत, त्यांच्या वर्तनांतील विसंगतीचें दिग्दर्शन करण्यांत, आणि त्यांचा निखालस मूर्खपणा त्यांच्या पदरीं घालण्यांत तुकारामाने आपली वाणी वेंचली. छत्रपति शिवाजीची संभावना सुद्धा 'तुम्हापाशीं आम्हां येऊनिया काय ?' या सत्य पण बोचक शब्दांनी करण्यांत आली. इतरेजनांना तर त्याने आपल्या अभंगांतून उघड पैजारा मारल्या आहेत. गोड बोलून लोकांना गुंगविण्यापेक्षा अप्रिय बोलून त्यांना धक्का देण्यांतच तुकारामाला धन्यता वाटे.

गेल्या शतकांतील महाराष्ट्राचे दोन विचाराग्रणी लोकहितवादी आणि आगरकर यांनी सुद्धा दोषदर्शन हेंच आपलें जीवितकार्य मानलें. जरा जनतेच्या मनासारखें बोलून लोकप्रियता मिळविण्याचा मोह त्यांनी निश्चयपूर्वक टाळला. लोकांना रुचेल तें नव्हे तर स्वतःच्या विवेचक बुद्धीला पटेल तेंच बोलावयाचें असा आगरकरांचा पण होता. त्यांची विदारक विवेचक बुद्धि समाजांतील अनेक दोषांवर अनिर्बंध फिरल्यामुळे रुष्ट झालेल्या गुंडांनी जीवंतपणीं त्यांची प्रेतयात्रा काढली. पण 'तुटो हें मस्तक पडो हें शरीर' या निर्धाराने आगरकरांनी आपलें अप्रिय पण पथ्य भाषणाचें व्रत आमरण चालविलें.

समाजाला मात्र हितकर्त्यांचें हें सडेतोड भाषण कधी मानवलें नाही. सॉक्रेटिसा-प्रमाणेच सत्यभाषी ख्रिस्ती धर्मसंस्थापक येशूला क्रुद्ध समाजाने सुळावर चढाविलें. आजहि आपण दांभिकाला जवळ करून ऋजु बोलणाराला दूर लोटतो. म्हणूनच पाणी हें उंचीवरून खोलीकडे वाहणार हा निसर्ग नियम जितका निरपवाद तितकेंच 'अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः' हें सत्य त्रिकालाबाधित आहे. जन्मसिद्ध राजाला काय अथवा लोक-नियुक्त मंत्र्यांना काय टीकाकार हा विषसमान वाटतो. विरोधी चळवळीच्या दडपशाहीचा उगम मानवी मनाच्या स्वयंतुष्ट असहिष्णु अहंकारांत सांपडेल.

आत्मगौरव हा मिष्टान्नाप्रमाणे गोड वाटला तरी मिष्टान्न जसें प्रकृतीला अपायकारक तसाच तोहि आत्मोन्नतीला विघातक आहे. खुशमस्कऱ्यांच्या कोंडाळ्यांत आत्मज्ञान तर दुर्लभ असतेंच, शिवाय आत्मस्वरूपावर आभासाच्या धुक्याचें आवरण बसून दिशाभूल सुलभ होते. राजा लियरच्या मधुभाषी मुलींनी सत्यभाषी मुलीशीं त्याचें वितुष्ट आणून त्याला आत्मनाशाच्या वाटेला लाविलें. या गोड जाळ्यांत न फसणारा एखादाच. राजा क्यानूटला जेव्हा धर्मगुरूने 'महाराज आपली सत्ता पृथ्वीप्रमाणे समुद्रावरहि चालते,' असें सांगितलें तेव्हा त्या धूर्त राजाने भरतीच्या वेळीं किनाऱ्यावर खुर्ची ठोकून वरुणाला मागे हटण्याची आज्ञा केली. निसर्गक्रमाने वरवर चढणाऱ्या लाटांनी राजाची पावलें भिजविलीं, आणि धर्म-गुरूच्या सुधास्यंदि मुखावर खरमरीत थप्पड बसली.

संक्रांतीला तिळगूळ देऊन 'गोड बोला' अशी विनंती करण्याऐवजीं पाडव्याला कडुलिंबाचें पान देऊन 'कडू सत्य बोला' अशी विनंती करण्याची प्रथा पाडली तर ती समाजधारणेला व सुधारणेला अधिक अनुकूल ठरेल. खरा सुहृद् तो की जो अनिष्टापासून

परावृत्त करून हिताकडे आपणाला वळवितो. पण हें कर्तव्य त्याला अप्रिय बोलल्यावाचून पार पाडतां येणार नाही. अनुकूल परिस्थितींत गोड गुंजन करणारे चित्तशोषक अनेक जमतील; पण या लूटमारींत सामील न होतां कान उघाडणी करण्याचें कठोर कर्तव्य निष्ठेने करणारा विरळा.

मात्र कटु भाषण म्हणजे खवचट भाषण नव्हे. कांही स्वयंमन्यांना दुसऱ्यांचा पाण-उतारा करण्यांत प्रौढी वाटते. अवहेलना, उपहास वा कुचेष्टा यांपैकी कोणत्यातरी मात्रेचे वळसे दिल्यावाचून शब्दच त्यांच्या तोंडांतून बाहेर पडत नाही. अगदी क्वचित् प्रसंगीं असल्या वागस्त्राचा उपयोग उपकारक ठरेल, पण सामान्यतः त्याची प्रतिक्रिया म्हणजे कुढणारा द्वेष एवढीच होऊं शकते. हितोपदेश झाला तरी हितबुद्धीने केलेला असेल तरच कल्याणकारक होईल. माता किंवा पत्नी यांचे वाग्बाण द्वेषबुद्धि निर्माण करीत नाहीत याचें कारण त्यांचीं टोकें विषाने नव्हे तर प्रेमाने मढवलेलीं असतात. वैऱ्याने दिलेलें गरळ आणि वैद्याने योज-लेलें जहर यांत जो फरक तोच लब्ध प्रतिष्ठित आणि हितचिंतक यांनी केलेल्या कटु भाष-णांत आढळतो.

म्हणून अंतरीचा जिव्हाळा हाच भाषणाचा एकमेव निकष होय. बहुतेक संभाषणें संशय, अहंकार, स्वार्थ वा मत्सर यांनी दूषित असतात. ख्रिस्ताने शेजाऱ्यांवर प्रेम करण्याची शिकवण दिली; आपले साधुसंत भूतमात्रावर प्रेम करण्याचाहि उपदेश करतात. दोघांचाहि हेतु आत्मौपम्य बुद्धि जागृत करण्याचा दिसतो. ती जर जागृत असेल, आणि ह्या शत्रुबुद्धीचा विनाश व्हावा म्हणून दर सायंकाळीं आपण दिव्याची प्रार्थना करतों ती जर नष्ट होईल तर इतरांशीं बोलतांना दंभ, छद्म कुत्सा यांचा अवलंब करण्याचा मोह आपणांस होणार नाही. सहानुभूतीचा झरा जीवंत असेल तर आपण गोड बोलतों का कडू याचा विचार करण्याचें प्रयोजन नाही. कडू भाषण ही शुभफलदायी होईल. दोषदर्शनाच्या कडू गाभ्यावरहि तुम्हांला मधुर भाषणाचें शर्कराव-गुंठन करतां आलें तर फारच उत्तम. पण तें साधलें नाही तरी कचरूं नका. हितकामना प्रेरणा देईल तसें बोला. गोडच बोला असा आग्रह नाही.

---

( पृष्ठ २४ वरून चालूं )

## ८. बाँबे बुक आणि ट्रॅक्ट सोसायटी

ख्रिस्ती धर्म प्रसारासाठीं देशी भाषांतून पुस्तकें प्रसिद्ध करण्यासाठीं ही संस्था १८२७ त स्थापन झाली. त्यापूर्वी १८२३ सालीं बायबलचीं सर्व भाषांत भाषांतरें करवून छापण्यासाठीं 'मुंबई बायबल सोसायटी' स्थापन झाली होती. ट्रॅक्ट सोसायटीने बरींच लहान मोठीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. रे. बाबा पदमनजी हे या संस्थेचे बरींच वर्षे संपादक असून त्यांनी सुमारें ५० पुस्तकें या सोसायटीद्वारा प्रसिद्ध केलीं. रे. शाहू कुकडे यांनीहि या संस्थेंत बरेंच काम केलेलें आहे. ट्रॅक्ट सोसायटीचें 'सत्यदीपिका' नांवाचें एक मासिक असे; त्याचे संपादक बाबा पदमनजीच होते.

( अपूर्ण )

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

१८६७ सालापर्यंतच्या
# महाराष्ट्रांतील साहित्य संस्था

लेखक :
श्री. चिं. ग. कर्वे

[ इ. स. १८६७ सालीं, रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांनी विविधज्ञानविस्तार सुरू केला. गुंजीकरांना १९४४ सालीं जन्मल्याला शंभर वर्षे होतात म्हणून त्याचें स्मरण राहावें यासाठीं मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयानें एक गुंजीकरव्याख्यानमाला गुंफण्याचें योजिलें होतें. या मालेंत बरींच व्याख्यानें झालीं. १८६७ सालापर्यंतच्या साहित्य संस्था ' असा माझ्याकडे विषय दिला होता व्याख्यानें पुढें प्रसिद्ध करण्याचेंहि संग्रहालयानें योजिलें होतें. पण तें जमलेलें दिसत नाही. तेव्हा त्या माझ्या व्याख्यानाचीं टांचणें आंता म. सा. पत्रिकेंत देत आहें. यांत आणखी भर घालतां येईलहि. पण तें काम केव्हांतरी सवडीनेंहि होणार असल्याने, जमाविलेलें साहित्य अभ्यासकांना उपयोगी पडावें या उद्देशानें असेंच देत आहें. ]

१८१८ सालापासून पुण्याचें महत्त्व जाऊन तें ब्रिटिश सरकारचें राजधानीचें शहर जें मुंबई त्यास प्राप्त झालें. मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांनी इंग्रजी राज्याची महाराष्ट्रांत नीट घडी बसविण्याची आटोकाट खटपट केली. सर्व बाजूंनी प्रगति व्हावी म्हणून नवीन नवीन संस्था, उद्योग व कारखाने काढले. विद्येला उत्तेजन प्रथम मुंबईस मिळालें व त्याच्या लाटा इतरत्र पसरूं लागल्या. मिशनरी मंडळींनीं ज्ञानाचा प्रसार सर्वत्र केला यांत शंकाच नाही. सातारचे महाराज प्रतापसिंह यांनी जें विद्योत्तेजन केलें तें फारसें माहीत नाहीं. जगन्नाथ शंकरशेट व भाऊ दाजी यांचे प्रयत्न सर्व क्षेत्रांत दिसून येतात. जांभेकर, दादोबा पांडुरंग, बाबा पदमनजी, मंडलीक, रानडे, छत्रे, भांडारकर इ. मंडळींचें संस्थाकार्य चिरस्थायी व फलद्रुप झालें आहे. १८६७ पर्यंतच्या बहुतेक प्रमुख संस्था मुंबईच्याच आहेत व तें क्रमप्राप्त होतें. चिपळूणकर–टिळक युग सुरू झालें तेव्हां साहित्याचा नवा प्रादुर्भाव पुण्यास दिसूं लागला.

## १. बॉंबे लिटररी सोसायटी

वाङ्मयाला वाहून घेतलेल्या या संस्थेची स्थापना २६ नोव्हेंबर १८०४ रोजीं परळ येथे झाली. या प्रसंगीं सर जेम्स मॅकिन्टाश यांचें भाषण उत्कृष्ट झाल्याचें नमूद आहे. रॉयल एशियाटिक सोसायटी प्रमाणेच या संस्थेचें कार्य असे. तेव्हां साहाजिकच या दोन्ही संस्था एकत्र झाल्या. बॉंबे लिटररी सोसायटीच्या सभांतून वाचलेले निबंध व टिपणें इ. स. १८७७ मध्ये रावसाहेब मंडलिक यांनी तीन भागांत प्रसिद्ध केली. या निबंधांना मंडलिकांनी चांगल्या संशोधनपर टीपा दिल्या असल्याने हे जुने निबंध संशोधकांना उपयुक्त वाटतील.

## २. बॉंबे ब्रँच, रॉयल एशियाटिक सोसायटी

प्रथम १८०४ सालीं ' बॉंबे लिटररी सोसायटी ' या नांवाखाली हिची स्थापना झाली. संस्थापक व पहिले अध्यक्ष सर जेम्स मॅकिंटॉश होते. पुढे रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ ग्रेटब्रिटन अँड आयर्लंड याशीं संयुक्त झाली. संस्थेचे सभासद पूर्वी फक्त युरोपियनच असत. त्यांना देशी भाषांची अभिवृद्धि नको होती, तर त्या समजण्यासाठीं

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

भाषांतरित पुस्तकें हवीं होतीं. तेव्हा त्यांनी देशी भाषांतील पुस्तकांचीं भाषांतरें-रूपांतरें केलीं यांत नवल नाही. सोसायटीचें नियतकालिक अशा लिखाणांना भरपूर वाव देई. रे. मिचेल यानें तुकारामावर लेख लिहिले असून महिपतीच्या पुराणांचीं भाषांतरें केलीं आहेत. या सोसायटीचें एकहि मराठी ग्रंथप्रकाशन नाही. सोसायटीची ग्रंथसूची व्हान्स केनेडी यांनी केली.

सोसायटीने पेशवे दफ्तर छापावें असा प्रयत्न राव. मंडलीक यांनी केला होता पण तो सफल झाला नाही.

बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांनी या व जिऑग्राफिकल सोसायटीच्या वार्षिक इतिवृत्तांत अनेक विषयांवर निबंध प्रसिद्ध केले आहेत.

## ३. अमेरिकन मराठी मिशन

—मुंबईस इ. स. १८१३त स्थापन झालें. प्रथम मुलींच्या शाळा काढण्यांत आल्या. पहिली शाळा १८२४ त मुंबईस काढली. ज्ञानोदय पत्र अहमदनगर येथे सुरू केलें (१८४२). इ. स. १८१७ मध्ये मुंबईस लांकडी छापखाना काढून पुढे टायपांचीहि तरतूद केली. पहिली धर्मपत्रिका या छापखान्यांत छापलेली आहे. नंतर मराठी बायबल काढण्यास सुरुवात केली. तें १८४७त डॉ. ॲलनने पूर्ण केलें. या छापखान्यामुळे पश्चिम हिंदुस्थानांत फार मोठें प्रकाशनकार्य झालें. खिस्ती मराठी वाङ्मयाचा जन्म या छापखान्यांत झाला. १८५८ त हा छापखाना विकला गेला. रे. रामकृष्ण विनायक मोडक यांनी अमेरिकन मराठी मिशनची संक्षिप्त बखर प्रसिद्ध केली आहे. पेशवाईनंतरचा महाराष्ट्र सामाजिक, शैक्षणिक व वाङ्मयीन याबाबतींत जो पुढें सरसावला तो या अमेरिकन मिशनमुळेच होय यांत शंका नाही. मराठी साहित्याचें पाऊल पुढे पडण्याला या मिशनरी लोकांचें फार साहाय्य झालें.

## ४. दक्षिणा फंड

पेशवे सरकार विद्वानांना श्रावणमासाची जी हजारों रुपये दक्षिणा वांटीत त्याप्रमाणे कांही रक्कम संस्कृतविद्येच्या उत्तेजनासाठी स्वतंत्र काढून ठेवून त्या रकमेंतून शाळा—कॉलेजें चालवावीत अशी एलफिन्स्टनची योजना होती. वांई व नासिक या ठिकाणीं संस्कृत कॉलेजें काढण्याचा त्याचा बेत रद्द होऊन १८२१ त विश्रामबाग वाड्यांत संस्कृत पाठशाळा निघाली. या पाठशाळेसाठी ५०००० रुपये सरकारनें नियुक्त केले. पुढें याचें डेक्कन कॉलेज बनलें.

## ५. दक्षिणा प्रैज कमिटी

ही संस्था दक्षिणाफंडांतून निर्माण झाली (१८५१). पेशव्यांची श्रावणमास दक्षिणा बंद करून इंग्रज सरकारने कांही विद्वान ब्राह्मणांस दक्षिणा वांटण्याचा शिरस्ता ठेविला. पुढे कांही रक्कम संस्कृतपाठशाळेला खर्च होऊं लागली. नंतर लोकहितवादींसारख्या सुधारलेल्या पुढारी मंडळींकडून सूचना आल्यावरून सरकारने असा ठराव केला की, पूर्वी वेत आलेल्या विद्वान ब्राह्मणांशिवाय नव्या विद्वानांस दक्षिणा द्यावयाची नाही; तर जुने मेल्यावर त्यांच्या द्रव्याची जी शिल्लक राहील ती ग्रंथ करण्याच्या कामाकडे लावावी. विश्राम बागेंतील संस्कृत पाठशाळा बंद पडल्यावर ग्रंथांना २००० रु. पर्यंत बक्षिसें देण्यांत येऊं लागलीं. पुढे ही रक्कम १००० वर उतरली.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रथम मराठी कविता व निबंध यांचे विषय देऊन बक्षिसांसाठी तीं मागविण्यांत येत' गुणानुक्रमें बक्षिसें देण्यांत येत. कमिटी अस्पृश्यांच्या व मुलींच्या शाळांना पैशाची मदत करी. १८६० त ही कमिटी रद्द होऊन तिची मालमत्ता कामकाज D. P. I. कडे आलें. पुणें ट्रेनिंग कॉलेजमार्फत कमिटीचा बक्षिसांबाबत व्यवहार चाले. पुढे डे. व्ह. सो. कडे बक्षिसें देण्याचें काम दिल्यानंतर ही संस्था कायमचीच बंद पडली.

## ६. नेटिव स्कूल सोसायटी–( दक्षिण कोंकण )

लेफ्टनंट जे. बी. जार्व्हिस याच्या खटपटीनें ता. १५ जून १८२३ रोजीं या संस्थेची स्थापना झाली. दक्षिण कोंकणांत देशी शाळा स्थापण्याचा उद्देश संस्थेने पुढें ठेवून वर्गण्या जमा केल्या व रत्नागिरी, नांदवेरा व चिपळूण या तीन ठिकाणीं मराठी शाळा उघडल्या. महंमद इब्राहिम पाच्छा व विठोबा रघुनाथ सावंत या दोन गृहस्थांची या कामीं फार मदत झाली.

**सातारा विद्यालय**

सातार्‍यास प्रतापसिंह महाराजांनीं एक विद्यालय स्थापन केलें होतें. त्यांत इंग्रजी, मराठी, संस्कृत, अरबी, फारसी इ. भाषांचें ज्ञान दिलें जाई. १८३३-४ सालीं या विद्यालयांत सुमारें २५० विद्यार्थी होते. या विद्यालयांतील एक अध्यापक नारायणराव यानें जॉन-विल्सन या मिशनर्‍याशीं हिंदुधर्मप्रकरणीं मोठा वाद केल्याचा इतिहास मिळतो.

## ७. बॉंबे नेटिव्ह एज्यूकेशन सोसायटी ( मुंबई शिक्षामंडळी )

ही संस्था १८२५ त स्थापन झाली. सरकारनें संस्थेला ५०००० रुपये ग्रंथ-प्रसिद्धीसाठीं दिले. यांतून बहुतेक शालोपयोगी ग्रंथ निर्माण झाले.* या संस्थेनें जें अतिशय महत्त्वाचें कार्य केलें तें म्हणजे 'मराठी-मराठी' ( १८२९ ) व 'मराठी-इंग्रजी' ( १८३१ ) कोश तयार करणें होय. कर्नल जर्व्हिस हा या सोसायटीचा चिटणीस होता.

* [ बॉंबे एज्युकेशन सोसायटीने १८२० सालीं The Native School-book and School commitee नांवाची एक समिति काढली. शाळांतून लागणारीं देशी भाषांतील पुस्तकें तयार करण्याचा उद्देश ठेवून समितीने काम सुरू केले. दोन वर्षांनंतर "The Bombay Native School-book and School Society" अशा नांवाच्या स्वतंत्र संस्थेत समितीचें रूपांतर झालें. ही खासगी वर्गण्यांवर चालली होती. पुढें १८२४ सालापासून सालिना ६०० रु. सरकारकडून मिळूं लागले. १८२५ सालीं सध्यां एल्फिन्स्टन कॉलेज आहे ती जागा संस्थेनें खरेदी केली. या संस्थेचें नांव "Bombay Native Education Society" असें बदलण्यांत आलें. एल्फिन्स्टन स्मारकाच्या पैशांतून संस्थेने एल्फिन्स्टन कॉलेज काढलें. पुढें तें सरकारच्या ताब्यांत गेलें. मुंबईत त्यावेळी प्रभू, शेणवी व पारसी याच समाजांतील कांहीं जणांना अशा शिक्षणाचें महत्त्व असे.

१८४० त नेटिव्ह बोर्ड ऑफ एज्युकेशनची स्थापना होऊन गुजराती-मराठी पुस्तकें निघूं लागलीं. १८५५ त डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शनचें खातें सुरू झालें. ]

( पृष्ठ २१ पाहा. )

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

## — परीक्षणें —

**अर्वाचीन मराठी वाङ्मय-सेवक ( तृतीय खंड )— [ ग्रंथकर्ता व प्रकाशक गं. दे. खानोलकर, स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, केळेवाडी, मुंबई ४ मूल्य ४ रु. ]**

श्रीयुत गं. दे. खानोलकर यांच्या अर्वाचीन मराठी वाङ्मय सेवकाचा पहिला भाग प्रसिद्ध झाल्याला बरींच वर्षे झालीं. त्यानंतर कांहीं वर्षांनी दुसरा भाग प्रसिद्ध झाला, त्याला तर आतां जवळ जवळ बारा वर्षे होत आलीं. मध्यंतरी गेलेल्या कालावधीमुळे खानोलकरांनी चालविलेलें हें अत्यंत उपयुक्त काम अर्धवटच राहतें की काय, अशी शंका वाङ्मयाभ्यासकांस त्रस्त करूं लागली होती. आणि खरोखरच तसें घडलें असतें, तर अभ्यासकांना अत्यंत खेद झाला असता यांत शंका नाही. कारण अर्वाचीन वाङ्मय सेवकाच्या पहिल्या दोन भागांनी मराठीच्या अभ्यासकांत फार मोठ्या अपेक्षा निर्माण केल्या होत्या. या दोन खंडांत वाङ्मयेतिहासदृष्ट्या महत्त्वाच्या चरित्रांचा विस्तृत व टीकात्मक अभ्यास, आणि त्याबरोबरच अगदीं किरकोळ आणि विस्मृतप्राय लेखकांच्याहि वाङ्मयीन कामाची माहिती कसोशीनें दिलेली आढळते. पण सर्वांत महत्त्वाचा विशेष म्हणजे प्रत्येक लेखकाच्या लिखाणाची व त्या लेखकासंबंधींच्या लिखाणाची संपूर्ण सूचि हें होय. अशा सूचींचें महत्त्व किती आहे व त्या तयार करण्यास खानोलकर यांस किती परिश्रम करावे लागले असतील, याची कल्पना आनुभविकांसच येईल.

अर्वाचीन वाङ्मयसेवकाचा हा तिसरा खंड बहिरंगाच्या दृष्टीने थोडा वेगळा असला, तरी उपरीनिर्दिष्ट अंतरंगगुणांच्या बाबतींत तो पहिल्या दोन खंडांहून कमी नाही, ही समाधानाची गोष्ट होय. वाङ्मयाभ्यासाला उपयुक्त असे चरित्रग्रंथ, समालोचनग्रंथ, सामुदायिक रीत्या लिहिलेले समालोचनग्रंथ वगैरे विविध प्रकारचें वाङ्मय मराठींत विपुल आहे. तथापि खानोलकरांच्या या ग्रंथमालेचें स्वरूप वाङ्मय कोशासारखें ( Literary Encyclopaedia सारखें ) असल्याने तो या सर्वसाधारण अभ्याससाहित्याहून अर्थातच वेगळा आहे. या ग्रंथमालेचें कांहीं क्षेत्र केतकरांचा ज्ञानकोश आणि चित्रावशास्त्रींचा चरित्रकोश यांनी आधींच व्यापलें आहे हें खरें असलें, तरी केवळ वाङ्मयाभ्यासाच्या दृष्टीनें तयार केलेला कोश असा हा मराठींतील पहिला व एकच होय. हा कोश वाङ्मयाभ्यासकास अत्यंत उपयुक्त झाला असल्यास नवल नाही.

अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या या तिसऱ्या खंडांतील प्रमुख चरित्रविषय म्हणजे डॉ. माधवराव पटवर्धन, पांगारकर व पण्डिता रमाबाई हे होत. या तिघांचेहि विस्तृत अभ्यास या ग्रंथांत अंतर्भूत करण्यांत आले आहेत, व हे तिन्हीं अभ्यासलेख अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त ठरतील असे आहेत. यांतील दोन म्हणजे पटवर्धन आणि पण्डिता रमाबाई यांचें अभ्यास स्वतः खानोलकर यांनी लिहिले आहेत, तर पांगारकर यांचा अभ्यास श्री. आजगांवकर यांच्यासारख्या अधिकारी लेखकांकडून लिहून घेण्यांत आला आहे. माधवराव यांच्या अभ्यासास सुमारें ४७ पानें देण्यांत आलेलीं आहेत. शेवटीं दिलेली वाङ्मय सूचीच सुमारें



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सहा सात पानें लांब आहे ! तथापि या विस्तृत अभ्यासांतील प्रारंभीचा, म्हणजे चरित्रात्मक भागच अधिक उपयुक्त व सुंदर वठला आहे. माधवरावांची विद्यार्थिदशा, त्यांच्यावर झालेले वाङ्मयीन संस्कार, त्यांनीं आणि रविकिरण मंडळानें वाङ्मय क्षेत्रांत उघडपणें हालचाल सुरू केली त्यावेळच्या वाङ्मयीन वातावरणाचें चित्र, वगैरेमुळें सुमारे १०-१२ पानांच्या मर्यादेंत त्यांनी माधवरावांच्या वाङ्मयीन विकासाचें उत्कृष्ट ' यथा-प्रमाण ' दर्शन घडविलें आहे. खानोलकर यांचा माधवराव याचेशीं प्रत्यक्ष संबंधहि बराच आलेला होता, पण त्या बरोबरच त्यांस माधवरावांच्या पत्नीनें लिहिलेल्या आत्मचरित्रपर पुस्तकाचा व माधवरावांच्या निधन-प्रसंगीं प्रसिद्ध झालेल्या खास अंकांचाहि बराच उपयोग झाला असेल. याच भागांत त्यांनी उद्धृत केलेली प्रो. श्रीधर बाळकृष्ण रानडे यांची आठवण अनंततनयांची पिढी आणि रविकिरण मंडळाची पिढी यांचें चित्र भावी पिढ्यांच्या डोळ्यासमोर उभ्या करण्यास फार उपयोगी पडेल. परंतु या अभ्यासाचा उत्तरार्ध, ( विशेषतः स्वप्नरंजनाच्या चर्चेपासून पुढील ), पूर्वार्धाइतका सुंदर वठलेला नाहीं. ' तुटलेले दुवे ' या काव्यासंबंधी उद्धृत केलेले रा. काळे यांचें विस्तृत मत, माधवरावांच्या काव्याच्या आकलनाला फारसें उपयुक्त नाहीं. शिवाय तें क्लिष्ट आणि या अभ्यास-लेखाचे प्रमाण बिघडविणारें आहे. माधवराव यांच्या सर्वच काव्यांचें व त्यांतल्या त्यांत प्रेमकाव्याचें विवेचन अधिकारी व्यक्तीनें विपुल केलेलें आहे. त्या विवेचनाची आणि वर उल्लेखिलेल्या लांबलचक अवतरणाची संगति लावणें कठिण आहे. किंबहुना खानोलकरांच्याच लेखनांतील इतर विवेचनाची आणि त्यांनी उद्धृत केलेल्या या मताची संगति लागूं शकत नाहीं. स्वतः माधवराव यांच्या प्रस्तावनांतून घेतलेले उतारे मात्र अर्थातच मार्मिक व उपयुक्त आहेत.

एवढ्या थोड्या अवकाशांत माधवरावांच्या वाङ्मयासंबंधीं व चरित्रासंबंधीं, विशेषतः चरित्रासंबंधीं इतकी अधिकृत व उपयुक्त माहिती अन्यत्र क्वचितच आढळेल. हें खरे असलें, तरी कांहीं स्थळीं खानोलकरांच्यासारखे माधवरावांशीं प्रत्यक्ष परिचय असलेले लेखक याहून अधिक स्पष्ट व निश्चित माहिती पुरवूं शकले असते-त्यांनीं ती पुरवावयास हवी होती असें वाटल्यावांचून रहात नाही. उदाहरणादाखल माधवराव यांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या आजन्म सेवकत्वाचा राजीनामा दिला त्यासंबंधीचा उल्लेख पहावा. यासंबंधांत खानोलकर लिहितात—

"एम्. ए. ची पदवी घेतल्यावर १९१८ सालीं ते पुण्याच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटींत दाखल होऊन फर्ग्युसन कॉलेजांत फारशीच्या अध्यापकाचें काम करूं लागले. १९२५ सालीं सोसायटीच्या सभासदांशीं 'निकराचा बेबनाव' झाल्यामुळे त्यांनी आपल्या जागेचा राजीनामा दिला. फर्ग्युसन कॉलेजसारख्या सुप्रसिद्ध व आदरणीय संस्थेशीं आयुष्याच्या उमेदीच्या काळांत संबंध येणें ही गोष्ट माधवराव अत्यंत महत्वाची घटना समजत. तर उलट ज्या घटनांमुळें त्यांना ती संस्था केवळ सहा सात वर्षांच्या आंतच सोडावी लागली त्या घटनांच्या स्मरणानेहि त्यांच्या मनाचा संताप होई, त्या घटनांचा विषय निघतांच त्यांच्या बोलण्याचा ओघ शेक्सपीरियन ट्रॅजेडीकडे, किंवा जगाच्या आरंभापासून चाललेल्या निष्कपट सज्जनांच्या छळाकडे वळे. अशा घटनांचें वर्णन, कायदेशीर जबाबदारी टाळणाऱ्या एखाद्या सरकारी अहवालासारखें करणें, ही गोष्ट गैर माहित व त्रयस्थ लेखकाच्या बाबतींत क्षम्य असली, तरी खानोलकरांच्या सारख्या लेखकाकडून वाचक अधिक स्पष्ट कथनाची अपेक्षा करतील. सुदैवाने खानोलकर हे स्वतंत्र व्यवसाय करीत असल्यानें

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

लाभाच्या अगर भीतीच्या दडपणानें अर्धवट लिहिण्याची त्यांस तरी गरज नाहीं. पण त्यांनीहि महत्त्वाच्या घटनांचा निर्देश टाळल्यावर सत्यापलापाचें हें कारस्थान (Conspiracy of Silence) पिढ्यान् पिढ्या तसेंच चालणार, अशी भीति वाटूं लागते ! अशा बाबतींत चरित्रकारानें एखाद्या जुन्या प्रकरणाचा न्याय निवाडा करीत बसण्याची जबाबदारी घ्यावी, असें आम्ही म्हणत नाहीं. तथापि व्यवस्थासंबंधीं लिहितांना खानोलकर जितपत निर्भयपणें लिहितात तितपतहि स्वमित्राच्या बाबतींत निर्भय झालेले नाहीत ! श्री. नागेश विनायक बापट यांच्यासंबंधी याच खंडांत लिहितांना ते लिहितात—या खात्यांत डेप्युटी एज्युकेशनल इन्सपेक्टर म्हणून ते काम पहात असत. या कामावर धारवाड व बेळगांव या ठिकाणीं ते चार वर्षे होते. पुढें या खात्यांतील उत्कर्ष सहन न होणाऱ्या त्यांच्या कांहीं हितशत्रूंनी त्यांचे विरुद्ध कारस्थानें रचून त्यांचे विषयींचें त्यांच्या वरिष्ठांचें मन कलुषित केलें. त्यामुळें १८७२चे सुमारास त्यांना आपल्या नोकरीस मुकावें लागलें. सुमारे पाऊणशें वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या गोष्टींसंबंधी निश्चित लिहितांना श्री. खानोलकर यांस फारशी शंका वाटूं नये, आणि जवळ जवळ त्यांच्या डोळ्यादेखत घडलेल्या व स्वतः चरित्रनायकाकडून शेंकडोंवेळां ऐकलेल्या उद्वेगजनक घटनांविषयीं लिहितांना मोघम लिहिण्याची आवश्यकता वाटावी हें पाहून सखेद आश्चर्य वाटतें. असे एक दोन ठिकाणचे ठळक अपेक्षाभंग विचारांत घेऊनहि माधवराव पटवर्धनांसंबंधीचा हा चाळीस पन्नास पानांचा अभ्यासलेख अभ्यासकांस बहुमोल आणि अधिकृत माहिती पुरवतो, हें कबूल केलें पाहिजे.

यानंतर इतक्याच महत्त्वाचा लेख म्हणजे कै. पांगारकर यांचें संबंधींचा होय. कै. पांगारकर हे एक अत्यंत लोकप्रिय आणि विपुल लिहिणारे लेखक होऊन गेले असले आणि प्राचीन वाङ्मयासंबंधींचा त्यांच्या लिखाणाचा आजच्या अभ्यासकांस फार मोठा उपयोग होत असला, तरी आधुनिक अभ्यासकांत त्यांचें नांव, थोडें नाक मुरडूनच घेण्याची पद्धत पडली आहे ! या पिढीच्या अभ्यासकांत त्यांच्या विपुल माहितीचा आणि सहृदयतेचा उपयोग होतो, यांत शंकाच नाहीं. तथापि पांगारकर बुवांच्या भाविकपणाची त्यांना मोठीच अडचण होते ! व म्हणून पांगारकरांच्या लिखाणांत बुद्धिवादाचा व चिकित्सकतेचा अभाव आहे असें म्हणत म्हणत, त्यांच्या विपुल वाङ्मयाचा फायदा घेण्याची प्रथा पडलेली आहे ! श्री. आजगांवकर यांनी या ग्रंथांत पांगारकरांचे खरे गुण आणि खरे दोष यांचें यथावत् दिग्दर्शन केलें आहे. श्री. आजगांवकर म्हणतात— "......पांगारकरांसारखे पुरुष निर्माण होण्यास भावी काल अत्यंत प्रतिकूल आहे. पांगारकरांच्या संतविषयक वाङ्मयांत, जेवढा श्रद्धेचा आणि भाविकपणाचा भाग आढळतो, तेवढा चिकित्सकपणाचा आढळत नाहीं, असा त्यांच्या वाङ्मयावर कांहींचा आरोप आहे. परंतु माझ्यामतें तो आरोप बहुतांशीं निराधार आहे. त्यांच्या मोरोपंत-चारित्रात, तुकाराम–चरित्रांत, मुक्तेश्वरावरील निबंधांत, आणि त्यांच्या महाराष्ट्र-वाङ्मयाच्या इतिहासाच्या तीन खंडांत त्यांनीं पुष्कळ चर्चा आणि चिकित्सा केली आहे. मात्र 'चिकित्सेसाठी चिकित्सा' त्यांनीं केली नाहीं, हें खरें. तरी महाराष्ट्र-सारस्वत-काराप्रमाणें निराधार विधानेंहि त्यांनी फारशी केलीं नाहीत. त्यांच्या संतविषयक वाङ्मयांतले ठळक दोष म्हणजे पाल्हाळ–पुनरुक्ति आणि वर्ण्य विषयांशी संबद्ध नसलेल्या गोष्टी विस्तारपूर्वक सांगण्याची प्रवृत्ति." श्री. आजगांवकर यांनीं व्यक्त केलेलें हें मत स्वतःस चिकित्सक समजणाऱ्या आजच्या पिढीनेहि मान्य केले पाहिजे. आणखीही एक गोष्ट मान्य करण्यासारखी असून मान्य केली गेली नाही. "पांगारकर हें चांगल्यापैकीं


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अर्वाचीन कवि होऊन गेले. ...... जुन्या कवितेच्या सतताभ्यासामुळें सुलभतेनें सुश्लिष्ट पद्यरचना करण्याचें सामर्थ्य त्यांना प्राप्त झालें होतें ...... आणि पांगारकरांच्या आर्या बाह्यतः थेट पंतांच्या आर्यांसारख्या आहेत. " पंतांना महा कवी मानणाऱ्या लोकांनी आज-गांवकरांसारख्या जुन्या काव्याच्या मर्मज्ञाचें हें मत लक्षांत घेण्यासारखें आहे. पण आश्चर्याची गोष्ट ही की मोरोपंती संप्रदायाच्या कवितेचे भोक्तेही पांगारकरांची गणना कविमालिकेंत करतांना आढळत नाहीत. जुन्या काव्यासंबंधींचा त्यांचा अभिमान काव्य-गुणावर अधिष्ठित नसून काव्यकालावर आधिष्ठित आहे, असें पांगारकरांच्या उदाहरणावरून फिरून एक वेळ म्हणावेसें वाटतें.

या नंतर या खंडांत आलेली महत्त्वाची चरित्रें म्हणजे पंडिता रमाबाई आणि ज्योतिराव फुले यांचीं होत. ज्योतिराव फुले यांच्या सामाजिक कार्याच्या श्रेष्ठतेकडे, आणि वाङ्मयीन कार्याच्या विवाद्यतेकडे पहातां या ग्रंथांत त्यांची माहिती अधिक विस्तृत व अधिकृत यावयास हवी होती. या ग्रंथांत त्यांची माहिती फक्त सहा सात पानें देण्यांत आली असून त्या सात पानांतलि सहा पानें तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या निबंधांतून उद्धृत केलेलीं आहेत ! लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या निबंधाहून या विषयावर अधिक सुव्यवस्थित विवेचन मराठींत झालेलें आहे. आणि शिवाय तर्कतीर्थांनी अन्य प्रसंगीं लिहिलेल्या विस्तृत लेखांतील एक उतारा देण्यानें या महत्वाच्या विषयावरील स्वतंत्र लेखाचें काम भागण्यासारखें नाहीं. सारांश माधवराव पटवर्धन, पांगारकर, नागेश विनायक बापट, हरि केशवजी पाठारे, नारायण भवानराव पावगी यांच्या बाबत अधिकृत संदर्भग्रंथ म्हणून या पुस्तकाचा जसा उपयोग होईल, तसा ज्योतिराव फुल्यांच्या बाबतींत मुळींच होण्याचा संभव नाही.

पंडिता रमाबाई यांचें चरित्र मात्र अगदीं त्रोटक असूनहि या ग्रंथांतील अत्यंत उपयुक्त अधिकृत भागांपैकीं आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. माहितीच्या व भाषेच्या दृष्टीनें या सुंदर चारित्रलेखांतहि एकदोन ठिकाणीं ढिलेपणा आढळतो. हिंदुस्त्रियांविषयीं बाईंनी लिहिलेल्या इंग्रजी पुस्तकाचें नांव "High Class Hindu Woman" असें दिलें आहे, तें बरोबर नाहीं; खरें नांव "High Caste Hindu Woman" असें आहे.

" पुण्याच्या " व " येथील " प्रार्थना समाज मंदिरांत बाईंचीं व्याख्यानें झाल्याचा उल्लेख या चारित्रांत आढळतो. वृत्तपत्रांत हा उल्लेख क्षम्य होता; ग्रंथात 'येथील' म्हणजे कोठील हें स्पष्ट होणें जरूर होतें. बाईंनीं धर्मान्तर केल्यानंतरचें त्यांचें समाजकार्य महाराष्ट्राला पसंत नव्हतें व नसणार. तथापि त्यांच्यावर वैयक्तिक महत्त्वाकांक्षेचा आरोप करणें बरोबर होणार नाही. निदान त्या आरोपास आधार या ग्रंथांत तरी दिलेला आढळत नाहीं. तसेंच " बाई जें कार्य करू इच्छित होत्या, तेंच कार्य पुढें प्रो. अण्णासाहेब कर्व्यांसारख्यांनीं समाजाला हळू हळू आपणाकडे वळवून करूनहि दाखविलें, " हें लेखकाचें मतहि दोन अगदीं भिन्न प्रकारच्या व दर्जांच्या व्यक्तींच्या महत्त्वमापनांत गल्लत करून टाकणारें आहे.

खानोलकर यांच्या ग्रंथांची योजना केवळ वाङ्मयाभ्यासाच्या दृष्टीनें केलेली नसून, मराठींतील कोणत्याहि विषयासंबंधीं लिहिणाऱ्या ग्रंथकारासंबंधीं माहिती पुरविण्याच्या दृष्टीनें केलेली दिसते व त्यामुळेच, बहुतांशीं वाङ्मय-विषयक माहितीनें भरलेल्या या पुस्तकांत मध्येच होमिओपाथिसंबंधीं ग्रंथरचना करणाऱ्या डॉ. पळसुले यांची माहिती, अगर "कर्तव्य ज्योतिषशास्त्र", "लग्नसाधन-सारण्या" इत्यादि ग्रंथ लिहिणारे शिवराम गणपत पवार यांची

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

माहिती आढळते! चरित्रांच्या क्रमासंबंधीं खानोलकर यांनीं प्रस्तावनेंत खुलासा केला असला तरी ज्या खंडांत नरहर रामचंद्र परांजपे, हरी माधव परांजपे, यांचीं चरित्रें सांपडतात त्या खंडांत शिवराम महादेव परांजपे यांचें चरित्र न आढळल्यानें संदर्भाच्या निमित्तानें पुस्तक उघडणारे वाचक खासच गोंधळांत पडतील. या खंडांतहि 'शिवराम महादेव परांजपे' हा शब्द योग्य अनुक्रमांत देऊन—"द्वितीय खंड पहावा" अशी माहिती त्यापुढें देण्यानें हा घोटाळा टाळतां आला असता.

ग्रंथाची भाषा स्थूल मानानें शुद्ध आणि प्रौढ असूनहि तिजमध्यें क्वचित् भाषा-शुद्धीच्या काळांत निर्माण झालेल्या विचित्र शब्दांचा शिरकाव झालेला दिसतो. 'तमाशाचार्य' (पा. ५०), 'उप–अध्यापक' (पा. ५८), यासारखें शब्द खानोलकरांनीं अधून मधून वापरले आहेत. बाळेकुंद्रीकर महाराजांची माहिती देतांना "अवधूत संप्रदायी ब्रह्मविद्" अशी दिली आहे. 'ब्रह्मविद्' याऐवजीं सत्पुरुष किंवा साक्षात्कारी पुरुष हे शब्द वापरण्यानें मराठी जन्मभाषा असलेल्या लोकांस अधिक बोध झाला असता. तसेंच माधवराव पटवर्धन व चंद्रशेखर यांच्या वाङ्मयीन संबंधाचे वर्णन करतांना खानोलकर म्हणतात–"चंद्रशेखराचें काव्यशिल्प त्याना आदर्श वाटे आणि तेवढ्यापुरतेच ते **आनृण्य स्वीकारीत**" या वाक्या-वरून वाचकांस काही बोध होईलसें वाटत नाहीं. अर्थात् अशा विचित्र आणि दुर्बोध शब्दांचा उपसर्ग आजकालचे गद्य लक्षांत घेतां या ग्रंथाला फारच थोडा झाला आहे, हें कबूल केलें पाहिजे. क्वचित् याच ग्रंथांत या उलटहि प्रवृत्ति आढळते. लेक्चरर व प्रोफेसर या दोन शब्दांना दोन मराठी वेगळे शब्द असावे म्हणून "उप–अध्यापक" हा अशुद्ध शब्द पत्करणारे खानोलकर, याच ग्रंथांत 'क्लासिकल कविता' असाहि शब्दप्रयोग करतात!

पुस्तकांत मुद्रणदोषहि तुलनात्मक दृष्टीनें पहातां फारच कमी आहेत. सारांश अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा मनःपूर्वक अभ्यास करणाऱ्यांना जे थोडे अधिकृत व बहुमोल ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांत खानोलकरांच्या मराठी वाङ्मयसेवकांच्या पहिल्या दोन खंडांची गणना पूर्वीपासूनच होत आहे व त्याच तोलाचा तिसरा खंड योग्य कालावधीने का होईना वाचकांना उपलब्ध करून दिल्याबद्दल मराठी अभ्यासक व मराठी विद्यापीठें खानोलकरांची ऋणी रहातील.

—(प्रा.) श्री. के. क्षीरसागर

**जयदामन्**—[ संपा० प्रा. हरि दामोदर वेलणकर, विल्सन कॉलेज, मुंबई. पृष्ठें ६०+१७५ मूल्य १० रुपये. ]

प्रा. ह. दा वेलणकर यांच्या शिष्यगणाने स्थापिलेल्या हरितोषसमितीने हरितोषमाला गुंफण्याचें योजिलें आहे. त्या मालेंतील जयदामन् हें पहिलें पुष्प होय. यामध्यें जयदेवकृत जयदेवछंद, जयकीर्तिविरचित छंदोनुशासन, केदारभट्टकृत वृत्तरत्नाकर आणि हेमचंद्रप्रणीत छंदोनुशासन असे चार महत्त्वाचे संस्कृत छंदोग्रंथ मुद्रित केले असून पुढे हे चार आणि पिंगल, भरत, इत्यादिकांचे आणखी सहा अशा दहा प्रमुख ग्रंथांतील सर्व संस्कृत वृत्तांचा सलक्षण व वर्गीकृत असा एक विस्तृत 'वृत्तकुसुमोच्चय' तयार करून दिला आहे. या वृत्त-कुसुमोच्चयासच जयदामन् असें नांव देण्यांत आलें आहे, या उच्चयांतील सर्व वृत्तनामांची सूचिहि वर्णानुक्रमाने करून जोडिली असल्याने त्याचा सुलभतेने उपयोग करण्याची चांगली

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सोय झाली आहे. प्रारंभीं संपादक प्रा. वेलणकर यांनी लिहिलेला एक सुदीर्घ इंग्रजी प्रबंध जोडलेला आहे. त्याच्या पहिल्या भागांत संस्कृतात छंदांची उत्पत्ति व विकास कसकसा होत गेला याची विस्तृत माहिती दिली असून पुढील भागांत या पुष्पांत मुद्रित केलेले चार ग्रंथ, त्यांचे कर्ते आणि हे ग्रंथ मुद्रित करतांना उपयोजिलेलें हस्तलिखितादी साहित्य या सर्वांची माहिती दिली आहे. अशा प्रकारचें या पुष्पाचें सामान्य स्वरूप आहे.

यांत जे चार ग्रंथ मुद्रित केले आहेत. त्यांतील पहिले दोन या वेळींच प्रथम प्रकाशित झाले असल्यानें या पुष्पाचें महत्त्व विशेष आहे. हे दोन्ही ग्रंथ आपल्यापरी महत्त्वाचे आहेत. पहिला जयदेवछंद यावर हर्षटाची टीका आहे तीहि उत्कृष्ट आहे. हा जयदेवच्छंद दुसऱ्याहि एका दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण पिंगलाच्या छंदःशास्त्रांत कांहीं प्रक्षेप झाले आहेत काय, तसेंच त्यांत कांहीं अपपाठ पडले आहेत काय, असल्यास ते प्रक्षेप व अपपाठ कोणते आणि पिंगलोक्त मूलपाठ कसा असावा हें निश्चित करण्यास या जयदेवछंदाचें बहुमोल साहाय्य होतें. जयदेव-छंदाच्या निरीक्षणानें असें ध्यानीं येतें की जयदेवानें पिंगलाचें छंदःशास्त्र प्रत्यक्ष पुढे ठेवूनच आपल्या ग्रंथांत त्याचा अन्य शब्दांत अनुवाद केला आहे. हलायुधाच्या टीकेसहित पिंगलाचें छंदःशास्त्र काव्यमालेंत व कलकत्ता येथे छापलेलें मिळतें तें आणि दशग्रंथी वैदिक मुखपरंपरेस अनुसरून म्हणतात तें या दोहोंमध्यें बरेंच अंतर आढळतें. वैदिकांच्या पठनांत येणारीं ५ सूत्रें मुद्रित पुस्तकांत नाहींत आणि पठनांत न येणारीं अशीं समवृत्तलक्षणें सांगणारीं २६ सूत्रें मुद्रित पुस्तकांत अधिक आढळतात. शिवाय त्यांत तिसांहून अधिक स्थळीं पाठभेद आढळतात. जयदेवछंदाच्या निरीक्षणानें असें निश्चित होतें कीं वैदिकांच्या परंपरागत पठनांत जें येतें तेंच पिंगलोक्त छंदःशास्त्राचें मूळ रूप होय आणि मुद्रित पुस्तकांत अनेक प्रक्षेप व अपपाठ पडले आहेत. जयदेवछंदाच्या साक्षीनें असें निर्विवाद ठरत असल्यानें त्या ग्रंथाचें महत्त्व फार मोठें आहे. व म्हणून हा ग्रंथ प्रकाशित करून संपादकांनीं फार मोठें कार्य केलें आहे यांत शंका नाहीं.

प्रस्तुत पुष्पांत जयदामन्‌संज्ञक जो संस्कृतवृत्तकुसुमोच्चय दिला आहे तो तयार करण्यांत संपादकांस फारच परिश्रम पडले आहेत यांत शंका नाहीं. हा कुसुमोच्चय म्हणजे संस्कृत वाङ्मयांतील वृत्तांचा सारसंग्रहच होय. अर्थात् त्याचा उपयोग आधारग्रंथ म्हणूनच कोणीहि करणार व त्यावर विश्वसून राहणार आणि म्हणूनच हा उच्चय सर्वस्वी निर्दोष असावा असेंच कोणीही अपेक्षील. पण सहज चाळीत असतां यांत कांहीं न्यूनाधिक असल्याचें ध्यानीं आलें, तें संपादकांच्या व याचा उपयोग करणाऱ्यांच्या निदर्शनास आणणें कर्तव्य होय असें समजून व विशेषतः ग्रंथ निर्दोष होण्यास साहाय्य व्हावें याच हेतूनें मी तें न्यूनाधिक दाखविण्यास प्रवृत्त होत आहें. माझा हा हेतु ध्यानीं घेऊन संपादक याचा विचार करतील अशी मला दृढ आशा आहे.

पिंगलप्रणीत छंदःशास्त्राच्या मुद्रित पुस्तकांत हंसरुत, विलासिनी, तत, कुसुमविचित्रा इत्यादि जीं २६ वृत्तें प्रक्षिप्त आहेत त्यांस पिंगलप्रणीत म्हणून गणणें प्रामादिक होय यांत शंका नाहीं. पण प्रस्तुत जयदामन्‌मध्यें त्या सर्व वृत्तांपुढे पिंगलाचा आधार दिलेला आहे.

पृष्ठ ११६ वर घन असें एक वृत्तनाम जयकीर्तीनें दिल्याचें नमूद केलें आहे तें चुकीचें आहे. जयकीर्ति म्हणतो "वनंचेन्मनोज्ञं । मनोहृज्जनानाम् ॥" ( २–९ ) वनंचेत्

म्हणजे यगणात्मक पाद असेल तर त्या वृत्तास मनोज्ञ म्हणावें असें जयकीर्ति येथे म्हणत आहे आणि मनोज्ञ या नांवाची अन्वर्यकता 'मनोहृज्जनानाम् या शब्दांनी त्यानें व्यक्त केली आहे.

पृष्ठ ११८ वर पुष्प असें वृत्तनाम भरताने दिल्याचें नमूद केलें आहे. पण हेमचंद्र समृद्धि असें या वृत्ताचें नांव देऊन त्यावरील वृत्तींत 'पुण्यमिति भरतः' असें म्हणतो आणि " पुण्यपाले शुद्धचित्तैः । या प्रदत्ता सा समृद्धिः " असें उदाहरण देऊन त्यांत समृद्धि या नांवाप्रमाणेंच पुण्य हें नांवहि गोवतो. अर्थात् त्याच्या साक्षीनें भरतोक्त नांव पुण्य होय, यांत संशय राहात नाही. हस्तदोषाने पुण्य याचे जागीं पुष्प असे पडणें किंवा तसें चुकीने वाचलें जाणें शक्य आहे. पुष्प असें कोठे पडलें असेल तर तो अपपाठ होय असेंच हेमचंद्राच्या आधारें म्हणणें प्राप्त होय.

पृष्ठ १२१--प्रमाणिका या वृत्तनामापुढे पिंगलाचा आधार दिला आहे. पण पिंगल प्रमाणिका असें नांव देत नाही. प्रमाणी असें देतो. तेंच पिंगलोक्त म्हणून सांगावयास हवें.

पृष्ठ १२१--'मधुकरसदृशाख्या' एवढें वृत्तनाम दिलें आहे. येथे मधुकरसदृशा असें नांव द्यावयास हवें. ख्यान्त नांवास भरताचा आधार दिला आहे. पण " चरणगतिविधौ सा मधुकरसदृशाख्या " या वचनांत भरताने मधुकरसदृशा असेंच नांव सांगितलें आहे.

पृष्ठ १२२--समानी या नांवापुढे वृत्तरत्नाकराचा आधार दिला आहे. पण त्यांत समानी असें नांव नसून समानिका आहे. तेंच द्यावयास हवें.

पृष्ठ १२४--भभभग या दशाक्षरी वृत्तास भरत दोधक म्हणतो असा आधार नमूद केला आहे पण तो अपपाठोत्पन्न असावासें वाटतें. काव्यमाला क्रमांक ४२ मध्ये छापलेल्या भरतकृत नाट्यशास्त्रांत पृ. १५४ वर दोधकाचें लक्षण पुढीलप्रमाणें सांपडतें.

प्रथमंच चतुर्थंच सप्तमं दशमं गुरु ।
अन्त्यंच त्रैष्टुभे पादे यत्र स्याद्दोधकं तु तत् ॥

यांत दोधक हें दशाक्षरी वृत्त सांगितलें नसून एकादशाक्षरी ( त्रिष्टुभ् ) सांगितलें आहे. दोधक हें पिंगलोक्त वृत्त असल्याने त्याच्या लक्षणांत इतर कोणी हेतुपूर्वक बदल करतील हें संभवनीय वाटत नाही.

पृष्ठ १२४ मससग या वृत्ताचें नांव ' कृतोद्धता ' असें देऊन त्यास भरत ३२-२१९ चा आधार दिला आहे. तेथें "पंक्तिः सा तु कृतोद्धतनामा" असें वचन आढळतें. यांत कृता हें पद निराळें काढलें पाहिजे हें उघड आहे. अर्थात् येथे वृत्तनाम उद्धता किंवा उद्धत असेंच दिलें पाहिजे. हेमचंद्रही उद्धत असेंच नांव देतो.

पृष्ठ १२७ जतजर या वृत्ताचें नांव हेमचंद्राच्या टीकेंत अवभ्रंशा दिल्याचें लिहिलें आहे. पृष्ठ ९८ वर ' अवभ्रंशाचेत्यन्ये ' असें पडलें आहे. पण हेमचंद्राच्या निर्णयसागरी-प्रतींत ' अभ्रवंशाचेत्यन्ये ' असें आहे. अर्थात् येथील वृत्तनाम अभ्रवंशा आहे अवभ्रंशा नाही. अनवधानाने अपपाठ कसे होतात याचें हें उदाहरणच होय. मद्रक-भद्रक, चंडवृष्टिप्रयात-चंडवृष्टिप्रपात वृत्ता-वृन्ता, नर्कुटक-नर्दटक, नन्दा-मन्दा, पुण्य-पुष्प, कामललिता-कामलतिका, जलदमाला-जलमाला, इत्यादि जोड्यांतील उत्तरपदें अर्थीच लेखन-वाचनप्रमादाने उत्पन्न झालेलीं दिसतात. अशा सर्व पाठभेदांचें नुसतें संकलन न करितां त्यांचें संशोधन करून शुद्ध मूलपाठ ठरविण्याचें कार्य हरितोषसमितीसारख्या विद्वन्मंडला-कडून व्हावें असेंच कोणीही अपेक्षील.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचायचे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

पृष्ठ १३०--मभसम या वृत्तास कान्तोत्पीडा म्हटलें आहे व पिंगलाचा आधार दिला आहे. पण हें वृत्त मूळ पिंगलांत ( पठनांत येणाऱ्या पिंगलांत ) नाही. तें प्रक्षिप्त आहे. तें असो. पण हलायुधानें दिलेलें कान्तोत्पीडावृत्त मभसम या गणांनी होणारें नसून भमसम या गणांनी होणारें आहे व त्यापुढील उदाहरणहि तसेंच आहे. हलायुधाच्या उदाहरणांप्रमाणे व लक्षणांप्रमाणें मभसम=जलधरमाला व भमसम=कान्तोत्पीडा अशीं हीं दोन भिन्न वृत्तें आहेत. पण म आणि भ यांच्या आकारसादृश्यामुळे त्यांचा व्यत्यय होऊन हीं दोन्ही वृत्तें एकच असें मासून हेमचंद्रानें जलधरमालेवरील वृत्तींत ' कान्तोत्पीडेत्यन्ये ' असें म्हटलें असावें असें म्हणणें भाग पडतें.

पृष्ठ १३५--मणिगुणनिकर वा वृत्तापुढे पिंगलाचा आधार दिलेला नाही यामुळे हें वृत्त पिंगलोक्त नव्हे अशी गैरसमजूत होण्याचा संभव आहे.

पृष्ठ १३५--मममयय या वृत्तास जयदेव मांडूकी किंवा चित्रा म्हणतो हें नमूद करावयाचें राहिलें आहे.

पृष्ठ १३५--रजरजर या वर्णवृत्ताचें उत्सव वा उत्साह हें नांव जयकीर्ति ६-३० वर देतो असा आधार दिला आहे. तो अयुक्त आहे. कारण जयकीर्तीचा सहावा अध्याय मिश्राधिकाराचा आहे, समवृत्तांचा नाही. ६-३० वर जयदेवाने उत्सव वा उत्साह वृत्त दिलें आहे तें समवृत्त नाही हें त्या लक्षणपद्यावरूनहि कळतें. त्यांत निश्चित गण नाहीत, तर गणविकल्प आहे.

पृष्ठ १३७--भरननगग या वृत्ताचें पिंगलोक्त नांव मत्तगजविलसित असें सांगितलें आहे. पण दशग्रंथी वैदिकांच्या पठनांत ऋषभगजविलसित असें नांव येतें तेंच खरें पिंगलोक्त नाम होय. मुद्रित पुस्तकांत आढळणारा मत्तगजविलसित हा अपपाठ होय.

पृष्ठ १३८--वाणिनी ह्या वृत्तापुढे जयदेवाचाहि आधार द्यावयास हवा. त्यानेहि तें वृत्त सांगितलें आहेच.

पृष्ठ १३८--शिखरिणीचे गण यमनभसलग असे दिले आहेत त्यांऐवजीं यमनसभलग असे हवेत.

पृष्ठ १३८--हारिणी आणि भाराक्रान्ता हीं हेमचंद्राने दिलेलीं वृत्तें देण्याचें राहून गेलें आहे.

पृष्ठ १४६--जयकीर्तीने वृत्तललिताचें दुसरें नांव ललितनृत्त असें दिलें आहे ( वृत्तललितं ललितनृत्तमपि...२-२७१ ) तें नांवहि द्यावयास हवें.

दंडकांची यादी दिली आहे तींत पिंगलोक्त पहिला दंडक जो चंडवृष्टिप्रयात त्याचें नांव आढळत नाही.

पृष्ठ १४८--प्रचिताचें लक्षण ६ ल + ७ य गण असें दिलें आहे, ते ६ ल + ७ रवड्‍र्यगण असें द्यावयास हवें.

पृष्ठ १५१--यववती असें नांव दिलें आहे. पण पिंगलोक्त नांव यवमती असें आहे आणि जयदेव, जयकीर्ति व केदारभट्ट यांनीहि यवमती असेंच नांव दिलें आहे. हेमचंद्राच्या छंदोनुशासनांत तेवढें यववती असें आढळतें, पण तो अपपाठच म्हटला पाहिजे. कारण पिंगलोक्त वृत्तनाम हेमचंद्रादिक बदलीत नाहीत.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनंगक्रीडा आणि अतिरुचिरा यांची गणना मात्रावृत्तांत केली आहे. पण त्यांतील लघुगुरु अक्षरांची संख्या व स्थानेंहि निश्चित असल्यामुळें त्यांची गणना वर्णवृत्तांत व्हावयास हवी.

वृत्तांपुढे ग्रंथकारांचे आधार त्यांच्या नांवाच्या वर्णानुक्रमाने दिले असल्यामुळे अर्वाचीन कवींचा आधार आधी व प्राचीन कवीचा नंतर असें घडलें आहे. हे आधार कालक्रमानुसार दिले असते तर कोणतें वृत्त प्रथम कोणत्या ग्रंथांत आढळतें हें समजून तें प्रचारांत येण्याच्या कालाचा अंदाज लागला असता व वृत्तांचा विकास कसकसा होत गेला हें ध्यानीं येण्यासहि मोठें साहाय्य झालें असतें.

ग्रंथाचे गुणांत भर पडावी याच हेतूने येथवर कांहीं न्यूनाधिक्य दाखविलें आहे. त्यांत कांहीं ग्राह्यांश असल्यास त्याचें ग्रहण संपादकाकडून होईलच. ग्रंथांत असें कांहीं न्यूनाधिक्य राहिलें असलें तरी त्याचें प्रमाण ग्रंथाच्या मानाने अत्यल्पच आहे आणि त्यांतील गुणगौरव त्या मानाने फारच मोठा आहे. विशेषतः जयकीर्ति आणि जयदेव यांचे ग्रंथ यांत प्रथमच प्रकाशित झाल्यामुळें हें पुष्प अमोलिक झालें आहे यांत शंका नाहीं. अशींच अनेक सुगंधित पुष्पें जोडून हरितोषसाभिती संकल्पिलेली माला त्वरित पूर्ण करील अशी अपेक्षा आहे.

—य. ग. फफे.

**भावीण**—[ लेखक—बा. भ. बोरकर; प्रका०—अ. अं. कुलकर्णी, कॉंटिनेंटल प्रकाशन, १९६।१९ सदाशिव, पुणें. २. किं. चार रु. ]

श्री. बोरकर यांच्या ह्या कादंबरीस परवांच्या गोमंतक साहित्य संमेलनांत "मुळगांवकर सुवर्णपदक" देण्यांत आलें. ह्या गौरवाबद्दल श्री. बोरकर यांचें मी अभिनंदन करतों.

आचार्य काकासाहेब कालेलकर यांनी प्रस्तुत कादंबरीविषयीं आपलें मत श्री. बोरकर यांना एका पत्रद्वारे कळविलें. निराळा अभिप्राय देण्याऐवजी तें पत्रच 'पत्रिकें'त प्रसिद्ध करणें समुचित होईल, म्हणून मी श्री. बोरकरांना तशी विनंती केली. ती त्यांनी मान्य केल्यामुळे आचार्य कालेलकर यांचें वाक्सुमन पत्रिकेस लाभलें आहे. ह्या अनुग्रहाबद्दल श्री. बोरकर यांचा मी फार आभारी आहें.

—संपादक

## आचार्य काकासाहेब कालेलकर यांचें पत्र

नयी दिल्ली
१५–३–५०

प्रिय कवि,

तुमचें पुस्तक "भावीण" मुंबअीलाच वाचून संपविलें होतें. चि. सरोजने तें आगगाडींत पुरें केलें. तुम्ही अेक अुच कोटीची कादंबरी लिहिली आहे यांत शंका नाहीं. कलेच्या दृष्टीने रचना सुंदर आहे. गोव्यांतील भावीण संस्थेविषयी जितकी माहिती आवश्यक आहे ती सर्व या पुस्तकांत येअून जाते. गोव्यांतल्या समाजाची मनोवृत्ति या बाबतींत कसा विचार करते हेंहि तुम्ही चांगलें व्यक्त केलें आहे. तुमच्या मराठींत प्रादेशिक वातावरण आणण्या-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

साठी तुम्ही स्थानिक शब्द वापरले आहेत तेहि आवश्यकतेहून अधिक नाहीत. मधूनमधून अेखाद्या संस्कृत किंवा मराठी शब्दाचा अर्थ बरोबर नसल्यामुळे ठेचाळल्यासारखें होतें; पण गोष्टीचा प्रवाह अितका वेगवान् आहे की त्या शब्दाकडे गेलेलें ध्यान चटकन् परत येतें आणि गोष्टीबरोबर धावूं लागतें.

चि. सरोज म्हणाली की ह्यपीच्या पात्राशीं तुम्ही समरस होअूं शकलां आहांत म्हणून तें सर्वांत चांगलें अुठावदार झालें आहे. तुमचा अंताजेट देखील खरेंखुरें जिवंत पात्र आहे. सरोज म्हणते की तुमचा केशवबाबा कांहीसा रुक्ष आणि Smug आहे. राष्ट्रसेवक पुष्कळदा असेच असतात हें दाखविण्यासाठी जर तुम्ही त्याला असा बनविला असेल तर तेथेहि तुमची कला सफलच झाली आहे असें म्हटलें पाहिजे.

शेवन्ती हें कादंबरींतील मुख्य पात्र आणि नायिका आहे. तिला तुम्ही मानवी देवी बनविण्याचा प्रयत्न केला आहे. शेवंतीचें चरित्रचित्रण वाचून कोणालाहि संतोषच वाटेल. तिला आत्महत्येपर्यंत पोंचवून तुम्ही तिचेविषयीं कमालीची सहानुभूति अुत्पन्न केली आहे.

सरोजची अेक टीका ध्यानांत घेण्यासारखी आहे. अेखाद्या Gig-saw puzzle मधे अेकूणअेक सगळे तुकडे अेकमेकांत जसे चाप बसतात, कोठेहि न्यूनता, ढिलेपणा किंवा फालतूपणा असत नाही, त्याप्रमाणे अेखादी गोष्ट रचली म्हणजे तीच त्या गोष्टीचा अेक दोष होअून बसतो. सर्व कांही स्वाभाविक आहे असें सिद्ध केलें तरी गोष्टीचा सर्वतोभद्र ( Symmetrical ) नीटसपणाच बोलूं लागतो की ही गोष्ट बनावटी आहे.

पुढे येणाऱ्या अडचणींचा अगदी पहिल्यापासून नेमका परिहार येथे योजून ठेवलेला दिसून येतो अेवढेंच नव्हे तर पकडला जातो. त्यामुळे कारागिरीविषयी आदर वाटूनहि सर्व गोष्टींतील स्वाभाविकता सुद्धा बनावटी वाटूं लागते.

भाविणींच्या दुर्दैवी संस्थेसंबंधाने सहानुभूति अुत्पन्न करण्याच्या प्रयत्नांत तुम्ही तिला इतकी 'आदर्शायण' (आदर्शायतन) बनवली आहे की जणू काय ही संस्था कायम टिकावी असाच तुमचा अभिप्राय असावा.

९२ पानावर तुम्ही भावीण धर्माला Idealise करण्याच्या प्रयत्नांत चांगलेच घसरलां आहांत. [ कादंबरीकार आपलीं सगळींच वचनें कोणा ना कोणा पात्राच्या तोंडी घालून मोकळा होतो त्यामुळे तो कोणाच्याच वचनाला किंवा अभिप्रायाला बांधला गेलेला नसतो हें मी जाणून आहें. ] त्या पानावर तुमची शेवंती म्हणते की "भावीण धर्म पत्नीधर्मापेक्षाहि दुर्धर आणि थोर आहे."

दुर्धर असेल पण थोर कसा ठरतो ? त्याअैवजी जर 'विषम' म्हटलें असतें तर यथार्थ झालें असतें. पत्नीधर्म आणि भावीण धर्म दोन्हीं सारखेच Idealise करून मग सांगा की भावीणधर्म पत्नीधर्मापेक्षा थोर आहे काय ? तुम्ही किंवा तुमची शेवंती म्हणूं धजणार नाही की भावीणधर्म पत्नीधर्मापेक्षा थोर आहे.

तुमच्या सर्व कादंबरीपासून मी जो बोध काढला आहे तो हा की **शेवंतीनेच नव्हे तर भावीण संस्थेनेच आत्महत्या केली पाहिजे.** तुम्ही सर्व घटना अशी कांही चातुर्याने जुळवून आणली आहे की शेवंतीने आत्महत्या करण्यावांचून दुसरा कोणताच स्वच्छ मार्ग अुरला नव्हता. Sometimes the cleanest solution for a knotty situation is death.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

येथे देखील सरोजिनीची कडक टीका आहे. ती म्हणते की शेवंतीने स्वतःचें शरीर प्रथम फ्रेडला अर्पण केलें होतें–स्वेच्छेने नव्हे पण भाविण जातिधर्मामुळे. पुढें त्याची थोर वृत्ति पाहून त्याचेविषयी तिला भक्ति वाटूं लागते. केशवसंबंधीं कांही विचार मनांत येतांच फ्रेडचा आपण द्रोह करतों असेंहि तिला वाटतें. केशव विवाहित आहे. विशिष्ट ध्येयाला बांधलेला आहे. सुधारणावादी असल्यामुळेच सामाजिक मूलभूत आदर्शांना त्याची निष्ठा दृढतेने वाहिलेली आहे. शेवंतीचें मन केशवाच्या आसपास घोटाळून तावडतोब परततें.

तिने असेंहि पाहिलें की, हॅपी वेडांत तिला जवळ करतो तें रंजनेच्या सादृश्यामुळे. हॅपीची हृदयनिष्ठा पाहिल्यापासून रंजनेलाच वाहिलेली आहे. आणि शेवंती हॅपीला जें कांही देते तें त्याला औषध म्हणून देते. आणि तो तिच्याशीं लग्न करायला तयार होतो तेंहि प्रेमापेक्षा कृतज्ञतेने, सामाजिक सुधारणेच्या कैफामुळे. सरतेशेवटीं हॅपीला कबूल करावें लागलें की प्रेमापेक्षा भक्तीची वृत्तीच त्याच्या ठायीं अधिक होती. शेवंतीच्या मनांत हॅपीविषयीं जो भाव आहे त्याला खरें नांव वात्सल्य हेंच आहे. ही वृत्ति तुम्ही फारच कुशलतेनें व्यक्त केली आहे. तुम्हाला ती साधली यामुळे सरोजला फारच आनंद झाला. शेवंतीपुढे हॅपी एक कुकूबाळच दिसतो. हृदयाची थोरवी आणि हृदयाचें आकलन या शेवंतीच्या गुणाला ओळखण्याची आणि त्याची कदर करण्याची शक्ति म्हणा, उंची म्हणा, तुमच्या फ्रेडमधेच दिसून येते. असें असतांना तुम्ही त्याला शेवटी शेवटी सिव्हिल मॅरेजच्या राजिस्टरवर सही करणाऱ्या साक्षीसारखा बनवला आहे यांत न्याय नाही आणि रसिकताहि नाही.

पुढल्या आवृत्तींत वाटल्यास फ्रेडने तळ्यांत उडी घालून बेभान शेवंतीला बाहेर काढावें. सर्व परिस्थिति समजून घ्यावी. आणि न्यायाधिशाच्या थोरवीने ठरवून टाकावें की शेवंतीचा स्वतःच स्वीकार करणार. मग फुलवंती आणि केशव या दोहोंनी शेवंतीला स्वतःचें हृदय ओळखण्याला मदत करावी आणि हॅपी आणि रंजना यांनी फ्रेड–शेवंतीला वचन द्यावें कीं भाविण संस्थेचा नाश करून गायक समाजाचा उद्धार करण्यासाठी तुम्ही जे प्रयत्न कराल त्याला सर्व प्रकारें मदत करण्याचें काम आमचें.

पुढे फ्रेडला कायमचा हिंदुस्थानांत बसवून द्यावा आणि त्याला एका नव्या कादंबरीचा नायक करावा. भारतीय संस्कृतीसंबंधी त्याला आदर आहेच. स्वतंत्र भारतांत या जोडप्याला तुम्ही खुलवून दाखवूं शकाल.

फ्रेडला या कादंबरींत तुम्ही चांगलाच अन्याय केला आहे असें तुम्हाला नाही का वाटत ? तुमच्या नव्या कादंबरींत गोव्यांतील ख्रिस्ती समाज आणि हिंदु समाज यांना फ्रेडभोंवती तुम्ही गुंफूं शकाल. फ्रेड ही तुमची कृति आहे. तिला अन्याय करणें म्हणजे स्वतःला अन्याय करणें आहे.

शेवंती, रंजना, हॅपी, केशव, कमली, फ्रेड इतकीं तयार पात्रें मिळालीं असतांना नव निर्मिति करून नवा विक्रम गांठणें मुळींच कठीण नाही.

शेवंतीला आत्महत्या करायला लावून तुम्ही समाजाची भाविणीविषयी सहानुभूति एका आवृत्तीपुरती मिळवालच. तेवढा फायदा पदरीं पाडून एक पाऊल पुढें जाणें शक्य आहे. वामन मल्हार जोशींनी 'आश्रमहरिणी' च्या नव्या आवृत्तींत फेरफार केला त्यापेक्षा तुमचा हा फेरफार अधिक काव्यमय आणि नवसृष्टीचा निर्माता बनूं शकेल.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येणें वाग्यज्ञें तोषावें
महाराष्ट्र साहित्य परिषद

सरोज म्हणते, त्याग हा आदर्श थोर आहे खरा. पण तो पायारूपच असतो. त्याचेवर कांही तरी पुरुषार्थाची रचना करून दाखविणें यांतच खरें कौशल्य आहे. जीवन साफल्य तर आहेच.

पत्र लिहाल तर वर्ध्याच्या पत्त्यावरच लिहा. 'महात्मायन' पुढे चालू असेलच.

काकाचे सप्रेम वंदे मातरम्

---

वळी—[ लेखिका- विभावरी शिरूरकर, प्रका०-देशमुख आणि कंपनी १९१ शनिवार, पुणें २ किं. पांच रु. ]

विभावरी शिरूरकर हिची ही नवीन ललितकृति. सुमारें पंधरा वर्षांपूर्वी ह्या लेखिकेनें आपल्या कथावाङ्मयानें मराठी वाचकांना विस्मयचकित करून सोडलें होतें. सुशिक्षित पांढरपेशा तरुणींच्या मनोभावनांचे कल्लोळ स्पष्टपणें मांडण्यांत तिने जी त्यावेळीं धडाडी दाखविली ती मराठीला नवीन होती. अर्थातच त्या लिखाणांतील भावनोत्कटता आत्मनिष्ठेतून उद्भवलेली होती. पण त्याच लेखिकेची परवा प्रसिद्ध झालेली ही 'बळी' कादंबरी ज्यांनीं वाचली असेल त्यांना तिच्या लेखणीचा सर्वांशीं कायाकल्प झाला असल्याचें दिसून आलें असेल.

प्रस्तुत कादंबरींत मांग-गारुडी जमातीच्या जीवनाचें लेखिकेनें दर्शन घडविलें आहे. तें अतिशय वास्तव आहे, तें सूक्ष्म आहे आणि तें भीषण आहे. शतकानुशतकें पददलित, दैन्यपीडित, असंस्कृत आणि अशिक्षित समाज कसा जगत आहे, हें पाहिलें म्हणजे 'हे माझे बांधव काय' असा प्रश्न वाचकाच्या मनांत उभा राहून वाचक बेचैन होतो.

भीषणतेचें स्वरूपहि फार व्यापक आहे. त्या जमातीला शिकवून त्या लोकांत नैतिक सुधारणा घडवून आणूं इच्छिणाऱ्यांच्या प्रयत्नांतील अर्धवटपणा आणि मतलबी दिखाऊपणा ही एक बाजू. ज्यांना आपल्या असंस्कृत, गलिच्छ व अज्ञान जिण्याची जाणीव झाली आहे व त्यांतून बाहेर येण्याची तळमळ आहे अशा मनांची धडपड आणि कुचंबणा ही दुसरी बाजू. नरकतुल्य जीवनाशीं समरस झालेला—स्वतःचा स्वतःच वैरी झालेला-खुद्द तो समाजच ही तिसरी बाजू. त्या समाजाच्या मनीं मुरलेली लाचारी, रक्तांत असलेली गुन्हेगारी आणि आपल्यापेक्षां निराळेपणा दाखवूं पहाणाऱ्याला कवटाळून आपल्यांतच ओढून जिरवूं पाहाण्याची आत्मघातकी प्रवृत्ति. अशा अनेक प्रकारच्या ओढाताणींत एक भावतरल तरुण कसा बळी पडला आहे तें ह्या कादंबरींत मार्मिकपणें दाखविलें आहे. लेखिकेने त्या जमातीचें जीवन अर्थातच जवळून पाहिलें असलें पाहिजे हें स्पष्ट आहे. त्याशिवाय इतकी सूक्ष्मता साधायची नाही. पण तें जीवन जवळून न्याहाळून त्याचें चित्रण करतांना तिच्या लेखणीची गुणवत्ताहि चांगलीच प्रकट झाली आहे. भाषा कथाविषयाला साजेशी व सुटसुटीत असून वर्णनांत संयमहि कौतुकास्पद आहे. लेखणीचा तोल जायच्या कांही जागा असतात. परिस्थितींत अंगावर कोसळण्याची कांही ठिकाणें असतात. अर्थातच त्यांतून शिरसलामत बाहेर पडण्यांत कला कसोटीला लागते. अशीं दोन तरी स्थळें ह्या कादंबरींत खासच आहेत. :—स्त्रिया पैशासाठीं आपल्या देहाचा विक्रा करतात. कादंबरींतील नायकाला—त्या कोंवळया तरुणाला

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आपल्या आईच्या जीविताची ती अनैतिक बाजू कळून येते. माणसाचें परमोच्च आदराचं ठिकाण म्हणजे आई. ती आपली आई तनुविक्रयाचें महान पातक करीत असते हें कळल्या-वर त्याला आईविषयीं अतिशय घृणा वाटल्याशिवाय कशी राहील ! मातेच्या साऱ्या महिम्यालाच इथें भूकंपाचा भयंकर धक्का बसतो, तिच्या माहात्म्यावर मुळांतच कुऱ्हाडीचा घाव बसतो. तथापि तो महिमा लेखिकेनें जसा एका तडाख्यासरशीं जमीनदोस्त झालेला दाखविला आहे, तसाच तो एकाच तरफेसरशीं तितक्याच प्रभावीपणानें पुन्हां उभारून दाखविला आहे

"तुमी प्वारं जल्माला आला म्हून शेज धराया लागली दुसऱ्याची चांगीला. काई इचार तरी करशील का समदं आपल्याच मनच लाड करशील ? धा प्वारं झालींत तिला. हाडं उरलींत तिची. त्या हाडांना वासना तरी उरलीय काय ? मरायाची वासना हाए बाकी. तरी बी तुमा पोरांना पोसाया हाडं टाकिती कुत्र्यांम्होरं"

आपली मावशी आपल्या आईबद्दल ( स्वतःच्या बहिणीबद्दल ) हें तळमळून बोलते तेव्हां आईबद्दलचा रसातळास गेलेला आदरभाव पुन्हां त्याच्या अंतर्यामीं उभारला जातो. माव-शीच्या उद्गाराचें हें सामर्थ्य म्हणजे लेखिकेच्या लेखणीची शक्ति होय. दुसरा प्रसंग असा कीं, एका मुलीचें मन त्या तरुणाकडे ओढ घेऊं लागतें, नव्हे, अंवतीं भोंवतींच्या लोकांच्या तशा प्रकारच्या बोलण्याने तो तिच्या मनांत भरवला जातो. त्याला आपल्या जाळ्यांत पुरता ओढण्याची तिची स्वाभाविकच लघळ-लोचट खटपट सुरू होते. हिकमतीनें त्याची एकांतात एकदा गांठ घेऊन त्याला भुरळ घालण्यालाहि ती कचरत नाहीं. पण ह्या खटपटीलाहि अपेक्षित यश येत नाही असें पाहून ती त्याच्या पौरुषाबद्दलच शंका घेते. तेव्हां तिच्या त्या निर्लज्जपणाला जें सक्रिय उत्तर दिलें त्यासाठीं:—

"आबाला चीड आली. त्यानें नामीला खसकन ओढलें. तिचा पदर हिसकला. वासना नागिणीसारखी फणा उभारून उठली आणि नामीच्या आव्हानाला त्याच्या वासनेनें उत्तर दिलें. नुसता सूड ! तो उठला. त्या खालीं पडलेल्या बीभत्स गोळ्याकडे त्यानें तिटकाऱ्यानें पाहिल."

एव्हढेच शब्द लेखिकेने खर्ची घातले आहेत. संभोगाचें वर्णन करण्याचा मोह व्हावा अशी ती जागा ! अर्थात् लेखकाच्या प्रकृतिधर्मानुसार त्या जागेचा उपयोग व्हायचा ! पण इथे लेखिकेचें कलात्मकतेकडे यत्किंचितहि अनवधान झालें नाही.

शेवटीं, कथावाङ्मयांत ( Poetic justice ) न्याय देण्याची भूमिका बजावण्याकडे लेखकाचा कल असतो आणि त्या नादांत वास्तवतेला हानी पोहोचते. पण तसाहि प्रकार इथें झाला नाही. भीषण पर्यवसनाकडे लेखणी तरस्वी नदीप्रमाणें सरळ सरळ वेगाने चाल-लेली दिसते.

अशी, खरीखुरी सामाजिक आणि हृदयस्पर्शी कादंबरी लिहून मराठी कथावाङ्मयाची पातळी वाढविल्याबद्दल विभावरी शिरूरकर हिला धन्यवाद.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

ओढ—[ लेखिका—शान्ता शेळके, एम्.ए. प्रकाशक, गो. रा. पाटणकर, कॉंटिनेंटल् बुक सर्व्हिस, ६२६ शनिवार पुणें—२ किं. चार रु. )

'कोष्टयांच्या जमातींतल्या एका श्रीमंत, मानधन, आणि प्रतिष्ठावान् कुटुंबाचे अखेर तुकडे तुकडे कसे झाले ती हृदयस्पर्शी कहाणी मी ह्या कादंबरींत निवेदन केली आहे' असें शांताबाई प्रस्तावनेंत सागतात. हें उद्दिष्ट ठेवून कादंबरी लिहिण्याचा हा उद्योग अर्थातच प्रशंसनीय असून, 'बळी' वाचून झाल्यावर, तसाच देखावा ह्या कादंबरींत दिसणार असेल तर मराठी कादंबरीचा रोख एका चांगल्या दिशेकडे वळला आहे, असें वाचक मनांत म्हणूं लागतो. परंतु तसें सामाजिक साक्षात्कारी दर्शन ह्या कादंबरींत घडत नाही. कादंबरींतील व्यक्तींचीं नांवें, पेशा, उलाढाली कोष्टयाच्या जमातीला जुळत्या असतील. पण कादंबरींतील कथानक आणि घटनात्मक पेंचप्रसंग त्याच जमातीपुरते मर्यादित नसून सार्वजनिक स्वरूपाचे आहेत.

पहिल्यांदा मोठा खटका उडतो तो घरभरणीच्या वेळीं वधूला सासरच्या मंडळीकडून आलेल्या वस्त्रप्रावरणांत एक कुलपरंपरागत अशी शकुनाची पैठणी असते ती वधू स्वीकारीत नाही म्हणून. नवी कोरी पैठणी पाहिजे असा वधूचा—गोपीचा हट्ट. हट्टाचें पर्यवसान बेबनावांत होतें, घरभरणी रहित होते. वधू माहेरींच राहते. अखेर आंतरिक ओढीने ती आपला पीळ सोडून, एक दिवशीं वडिलांच्या मताची वा रोपाची कदर न करतां, गुपचुप सासरीं जाते. ह्या घटनेप्रीत्यर्थ खर्चीं पडलेलीं पृष्ठें लक्षांत घेतां, ह्या घटनेला प्रारंभींच दिलेलें ऐसपैस प्राधान्य ध्यानीं घेतां, असें वाटतें की त्या प्रकरणांतूनच पुढचीं सर्व प्रकरणें उद्भवणार. पण ही अपेक्षा फोल ठरते. गोपीची विधवा जाऊ आणि विधुर दीर ह्यांच्या चोरट्या प्रणयकथेलाच पुढे प्राधान्य लाभतें. ती प्रणयमूढ विधवा साधी भोळी आणि प्रेमळ अशी दाखविली आहे. घरांत तिच्याबद्दल सर्वांनाच माया. दीर आपल्याशीं पाट लावील अशी तिची अपेक्षा. दिरानेंहि तशी कबूली दिलेली असते. पण पुढे मातृपदप्राप्तीचीं पूर्वचिन्हें दिसूं लागतांच ती पाटाचें बोलणें काढते, तेव्हा तिचा प्रियकर दीर घराण्याच्या प्रतिष्ठेचें बुजगबाहुलें पुढे करतो. सासराहि त्याच मताचा. त्यालाहि पाटाची कल्पना नापसंत आणि तिला नादीं लावणाऱ्या आपल्या पोराला बोल लावण्याऐवजी, घराण्याची प्रतिष्ठा सांभाळण्याचा एकमेव मार्ग म्हणून तो तिच्यापुढेच विषाचा पेला धरतो. गोपीच्या नवऱ्याला हा अन्याय सहन होत नाही. पण घराण्याच्या प्रतिष्ठेचा बागुलबोवा पुढे करून बाप त्याला गप्प बसवितो. अशा रीतीने त्या बालविधवेचा—सरस्वतीचा बळी हाच कादंबरीचा पुढे मुख्य भाग होऊन बसतो. कथानकाची घडण ह्या दृष्टीने विचार करतांना ह्या बनावामुळे बांधेसूदपणाला ढळ पोहोचतो. कोणत्याहि विशिष्ठ पात्राला वाजवीपेक्षा अधिक महत्व येऊं नये असें लेखिकेने मत व्यक्त केलें असलें तरी तें केवळ समर्थनपर आहे, असाच वाचकाचा ग्रह झाल्यशिवाय राहात नाही आणि सरस्वतीची कहाणी ही केवळ कोष्टी जमातींत घडणारी दुर्दैवी घटना नसून सार्वत्रिक स्वरूपाचीच कहाणी आहे, त्याबद्दलहि वाचकाला शंका उरत नाही.

लेखिका ह्या कादंबरींत सर्वच पात्रांशीं सारखेपणाने समरस झालेली नसून, स्त्री भूमिकांशींच आणि त्यांतल्या त्यांत सरस्वतीशीं विशेष समरस झालेली दिसते. तिची स्वप्नसृष्टि रंगाविण्यांत जें तादात्म्य लेखिकेला साधलें आहे तें इतर भूमिकांच्या मनोव्यापारांबाबत साधलेलें नाही. अर्थात् हें स्वाभाविकच होय. भाषा ओघवती आहे, मधुर आहे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कादंबरींत विशेष कोणत्या व्यक्तीबद्दल राग येत असेल तर तो गोपीच्या नवऱ्याबद्दल –रंगनाथबद्दल. घराण्याच्या प्रतिष्ठेच्या पायी सरस्वती बळी जात आहे हें त्याला दिसूं लागलें होतें. बापाने तिला विष पाजलें म्हणून तो त्याचेवर संतापतोहि. पण तो संताप बैल गेला नि झोपा केला ह्या न्यायाचा अतएव निरर्थक ठरतो. आणि घराण्याच्या प्रतिष्ठेचें भ्रामक कवंडळ अभंग राहण्यासारखी परिस्थिति नसतांना त्याने मुकाटपणानें होईल तें पाहावें ह्याचें वाईट वाटतें. शेवटी वडिलांच्या पश्चात् मालमत्तेच्या वाटण्या होत असतांना, आपला वाटा नाकारून तो घराबाहेर पडतो. ह्या त्याच्या त्यागालाहि महत्त्व येत नाही. ही ज्याची धमक होती त्याने घराण्याच्या प्रतिष्ठेचें तारू अमानुषतेने सावरण्याचा प्रयत्न करणाऱ्या वडिलांना विरोध करून आणि त्या विरोधापायी वडिलांच्या धनदौलतींतल्या सुतळीच्या तोड्याचाहि मोह नाही हें दाखवून ठाण मांडण्यांत खरा जीवनसंग्राम दिसला असता.

असें कांही न दाखविल्याने कादंबरीचा शेवट नेभळा वाटतो. 'ही वास्तवता आहे' असेंच लेखिकेचें म्हणणें असेल तर प्रश्न नाही.

—य. दि. पेण्ढरकर

चित्रा ( कादंबरी )— [ ले. बा. कृ. गलगली; प्रकाशक—केशव भिकाजी ढवळे, मुंबई ४; मूल्य साडेतीन रुपये ]

किर्लोस्कर मासिकाच्या साहित्य विभागाचे समालोचक म्हणून सर्वांना सुपरिचित असलेले बा. कृ. गलगली यांच्या लेखणींतून ही कादंबरी उतरली आहे. दुसऱ्या महा-युद्धाच्या सुरुवातीला भारत संरक्षक कायद्याखाली अटकेंत असतांना त्यांनी ही कादंबरी लिहिली आहे. त्यामुळे त्यावेळच्या राजकीय आंदोलनांचें कांहीसें प्रतिबिंब या कादंबरींत पडावें हें अपरिहार्य आहे. पण कादंबरीचा मुख्य विषय तो नाही. रविकान्त व चित्रा या नायकनायिकांच्या द्वारे रोमँटिक प्रेमाच्या नव्या स्वरूपाचा आविष्कार करण्याचा यांत त्यांनी प्रयत्न केला आहे.

साहित्यक्षेत्रांत प्रसिद्धीला येत असलेली नवोदित लेखिका चित्रा व सुप्रसिद्ध चित्रकार रविकान्त या दोन कलावन्तांची प्रथमभेट, परिचय, परिचयाचें प्रेमांत रूपान्तर व त्याचें सह-जीवनांत झालेलें पर्यवसान हा या कादंबरीच्या मुख्य कथानकाचा आराखडा आहे. हा आराखडा भरतांना चित्रा व रविकान्त या दोघांच्या मनांत निर्माण झालेल्या मानसिक आंदोलनांचें चित्र लेखकाने चांगल्या रीतीने रेखाटलें आहे. 'खऱ्या प्रेमाला विवाह संस्काराचें बंधन नको-प्रेम आणि विवाह या दोन गोष्टी एकमेकांना मारक आहेत-प्रेम म्हणजे मानसिक स्वातंत्र्य-आपल्या प्रेमाच्या कल्पना सरंजामी शृंखलांनी जखडल्या आहेत, त्यांतून आपण प्रथम मुक्त होऊन या नव्या प्रेमाचें स्वागत केलें पाहिजे' अशा क्रान्तिकारक विचारांचा पुरस्कार रविकान्त करतो व चित्रा त्या विचारांशीं सहमत होऊन त्याच्याबरोबर सहजीवन जगण्यास सिद्ध होते.'

प्रेमाचें हें तत्त्वज्ञान क्रान्तिकारक आहे हें खरें असलें तरी अशा क्रान्तिकारक विचा-रांचा स्वीकार करण्यास भाग पडावें अशा अपरिहार्य घटना लेखकाने निर्माण केल्या नाहीत. रविकान्ताच्या या विचारांची ओळख आपणाला व चित्राला अगदी शेवटीं शेवटीं होते. पण त्या विचाराच्या पाठीमागे असलेले भावनांचें आंदोलन व अनुभवाची कटुता आपणाला



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कुठेच वर्णन केलेली आढळत नाही त्यामुळे हें तत्त्वज्ञान परिणामकारक तर वाटत नाहीच पण तें सामान्य वाचकाला उत्कटतेने पटेल असेंहि वाटत नाही. चित्राला तें पटलें याचें करण तिचें रविकान्तावर असलेलें प्रेम असें फार तर म्हणतां येईल.

रविकान्त व चित्रा यांच्या जोडीला शकुन्तला व गिरीश हें जोडपें आलें आहे. पण कादंबरीच्या मुख्य तत्त्वज्ञानाला या दोघांचीहि फारशी मदत होण्यासारखी नाही. शकुन्तलेचा गायन शिक्षक जहांगीर याने भावनेच्या भरांत शकुन्तलेवर आणलेला प्रसंग, त्यामुळे तिला करावा लागलेला गृहत्याग व पुढें गिरीश युद्धावर गेल्यामुळे त्याची व तिची झालेली ताटातूट येवढाच कथाभाग या कादंबरीत आहे. या शिवाय चित्राचा माऊ आनंद, तिची शिष्या सुशीला, रविकान्ताचा मित्र फ्रांझ म्युलर, पश्चात्तापाने जळणारा गायक जहांगीर इत्यादि अनेक पात्रें प्रसंगाच्या ओघांत या कादंबरींत आलीं आहेत. या पात्रांच्या गर्दीमुळेच या कादंबरींत एक मुख्य दोष निर्माण झाला आहे. तो म्हणजे कोणत्याच पात्राचें स्वभावरेखन परिपूर्ण झाल्यासारखें वाटत नाही. एखाद्या समारंभाच्या गर्दींत निरनिराळया लोकांची आपणाला कुणी ओळख करून द्यावी व त्यांची घाईत माहिती सांगावी, म्हणजे त्या व्यक्ति जितपत मनावर परिणाम करतील तितपत परिणाम या सर्व पात्रांची ओळख करून घेतांना होतो. कथानकहि त्यामुळे विस्कळित झाल्यासारखें वाटतें. रविकान्त व चित्रा या दोनच पात्रांना हाताशीं धरून लेखकांने आपलें प्रमेय मांडलें असतें तर तें अधिक परिणामकारक झालें असतें असें वाटतें.

श्री. गलगली यांची भाषाशैली चांगली आहे. निरनिराळीं वर्णनें ते उठावदारपणें करूं शकतात. भावनोत्कट प्रसंगहि परिणामकारक रीतीने रंगविण्याची हातोटी त्यांना साधली आहे. पण कथानकाच्या या गर्दीमुळे त्यांना कथानकाची पकड वाचकांच्या मनावर शेवट-पर्यंत कायम ठेवणें जमलें नाही.

ज्या वातावरणांत त्यांनी ही कादंबरी लिहिली त्याचाहि कदाचित् हा दोष असेल. पण त्यांच्या पुढील कादंबऱ्यांविषयी अपेक्षा निर्माण करण्याइतके प्रतिभेचें बीज या कादंबरींत निश्चित आहे असें वाटतें.

**( प्रा. ) म. ना. अदवंत.**

**प्रीतीची रीत** [कादंबरी]— ( ले. वि. सि. गुर्जर; प्रकाशकः केशव भिकाजी ढवळे, मुंबई ४ मूल्य–साडेपांच रुपये)

कथावाङ्मयाच्या क्षेत्रांत वि. सि. गुर्जरांचें नांव मागील पिढीच्या वाचकांना तरी सुपरिचित आहे. पसतीस वर्षांपूर्वी मराठी लघुकथेला नवें वळण लावण्याचा व नवें स्वरूप देण्याचा त्यांनीं ज्याप्रमाणे प्रयत्न केला त्याप्रमाणें अनेक वंग कथांचीं आकर्षक रूपांतरें करून मराठींत स्पृहणीय भर घातली. 'प्रीतीची रीत' ही कादंबरीहि त्यांनीं एका वंगीय कादंबरीच्या आधारें लिहिली आहे व गुर्जर-वाङ्मयांत दिसून येणारे सर्व गुण व दोष याहि कादंबरीत आढळून येतात.

भालचंद्र, मालविका व दमयंती या तिघांच्या प्रेमाच्या त्रिकोनावर कथानकाची उभारणी केली आहे. काकांच्या कृपाछत्राखाली पूर्णपणें परावलंबी झालेल्या भालचंद्राच्या मनांत प्रेमाचें बीज पडल्यापासून त्याची विवाहांत पारिणति होईपर्यंतच्या या कथाभागांत

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मालविकेकर प्रेम करणाऱ्या भालचंद्राची, भालचंद्र व किशोर यांच्यामध्यें घुटमळणाऱ्या मालविकेची व भालचंद्रावर निःशब्द प्रेम करून त्याच्यावरील व मालविकेवरील प्रेमासाठीं स्वार्थत्याग करणाऱ्या दमयंतीची मानसिक आंदोलनें गुर्जरांनी अतिशय चांगल्या रीतीने रंगविलीं आहेत. कादंबरीचें कथानक त्यामुळेच रंगत जातें व मनाची चटकन पकड घेतें. पण त्याबरोबरच भालचंद्राचें स्वभावचित्र थोडेसें अवास्तव वाटतें. एम्. एस्सी. होईपर्यंत काकांच्या संरक्षणाखालीं कॉलेजांत जाणारा व कॉलेजांतून परत येणारा कॉलेजकुमार ( तशांत लक्षाधीश ) या युगांत सांपडेल असें वाटत नाहीं. शिवाय मुंबईत नेहमीं राहणारा तरुण कितीहि परावलंबी असला तरी मैलबार-हिलवर दोघे साहेबांच्या बंगल्यांत शिरतांना तो स्वतःला इतका हास्यास्पद करून घेईल असेंहि वाटत नाही. परिस्थितीच्या व शिक्षणाच्या मानानें भालचंद्र अतिशय बावळट दाखविला आहे. मूळ कथेचाच हा दोष असल्यामुळें कदाचित् लेखकाचा नाइलाज झाला असेल.

गुर्जरांची भाषाशैली प्रसादपूर्ण आहे-पण संवादांतून मात्र पात्राचें निराळें व्यक्तिमत्व प्रतिबिंबित होत नाहीं. त्यांचीं सर्व पात्रें सारखीच बोलल्यासारखीं वाटतात-सारखेच विस्मयाचे व आनंदाचे उद्गार काढतात-त्यामुळें संवादांतून व्यक्तिमत्त्वाच्या छटा व्हाव्या तशा व्यक्त होत नाहींत. गुर्जरांच्या बहुतेक कादंबऱ्यांतून व कथांतून हा दोष आढळतो.

शिवाय कथानकाचा विस्तार वाजवीपेक्षां जास्त झाल्यासारखा वाटतो. संक्षेपाचें तत्त्व बहुधा गुर्जरांना मान्य नसावें. त्यामुळें कथानकाच्या मानानें पाल्हाळच अधिक आहे. गुर्जरांच्या ' नागमोड ' वगैरे सारख्या इतर कादंबऱ्यांतूनहि हा दोष दिसतो.

पण प्रसन्न भाषाशैली व आकर्षक कथनपद्धति या दोन गुणांमुळें, वरील दोष असून सुद्धां कादंबरी वाचनीय वाटते. कथानकाची रचना पाल्हाळिक असली तरी विस्कळित नाहीं. शेवटपर्यंत वाचकांचें मन कथानकांत गुंतवून ठेवण्याची जी कला गुर्जरांच्या इतर कथा-वाङ्मयांत आढळते तिचा प्रत्यय इथेंहि येतो. कथानकाचे धागेदोरे त्यांनी व्यवस्थित संभाळले आहेत. थोडक्यांत गुर्जरी वळणाची ही कादंबरी आहे असें म्हटलें कीं त्यांत सर्व येईल.

—( प्रा. ) म. ना. अदवंत.

**जीवन लहरी**– [ कवि कुसुमाग्रज, प्रका. कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २ मुल्य २ रु. ]

श्री. कुसुमाग्रजांच्या कांहीं " जीवनलहरी " १९३३ सालींच प्रसिद्ध झाल्या होत्या. त्यांत भर घालून ही बहुतांशी नवीन आवृत्ति प्रकाशित केलेली आहे. श्री. कुसुमाग्रजांच्या यांतील " जीवन लहरी " अतिशय सुंदर आहेत. त्या केवळ वैशिष्ट्यपूर्ण वगैरे आहेत असें म्हणून भागणार नाहीं. या कवीचें वर्णन प्रकाशपूजक, अग्निसंप्रदायी, स्थंडिलवादी वगैरे विशेषणांनी केलें जातें तरी येथें त्यांच्या व्यक्तिमहत्त्वाच्या इतरही अनेक मोहक छटा प्रत्ययास येतात. आणि त्यांच्या समग्र व्यक्तिमत्वाच्या विविध,—क्वचित विरोधी भासाव्या इतक्या विविध,—छटा जशा यांत आढळतात, तशाच अंतर्गत प्रगतीच्या खुणाही यांत दिसतात. छोट्या स्वरूपांतील " जीवन लहरी " व या मोठ्या आवृत्तींतील " जीवन लहरी यांतील काळांत १६ वर्षांचें अंतर आहे. मध्यंतरी त्यांचा " विशाखा " काव्यसंग्रह प्रकाशांत येऊन मराठी साहित्यांत चिरंजीव होऊन गेला आहे.

म. सा. प. ( २३-१-६ )

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

काव्याच्या विश्वांत लहरावयास लागण्याच्या सुमारास आपल्या कडचे कवि अजूनपर्यंत रम्याद्भुत वातावरणांतच असत-असतातही. या वातावरणांत सौंदर्यसृष्टीचा हव्यास असतो, प्रेमवृत्तीची उत्कटता असते, आसक्तीची ओढ असते. एक तऱ्हेच्या स्वप्नाळूपणाची मोहिनी सबंध व्यक्तित्वाला आवरण घालीत असते. त्यांतूनच कधीं उदात्त आदर्शवादाचें पूजन सुरू होतें. श्री. कुसुमाग्रजांच्या "जीवनलहरी"च्या सुरवातीला ह्या सर्व भावनात्मक छटा आहेत. पण पुढें कवीचें गतिमान व्यक्तित्व शोधक आणि चिकित्सकहि बनतें. आशा—अपेक्षांचे भंग सर्वच कविहृद-यांचा कांहीं भंग करीत नाहीं. कवि कुसुमाग्रजांसारखे समर्थ कवि त्या भग्नावस्थेचीं गीतेंहि तेवढ्याच उत्कटतेनें गाऊं शकतात. त्यांत एक प्रकारचा उपरोध, विरोधाभास येणें अपरिहार्य असतें. परंतु हा उपरोध तुच्छतावादाची तड गाठीत नाहीं. जीवनांतील कांहीं उच्च मुल्यांचा तो आदर्श म्हणून स्वीकार करतो. स्थूल मूर्तिमंत वस्तुपेक्षां अमूर्त आदर्शीत मूल्यें त्याच्या पूजनाचीं स्थानें बनतात. " जीवनलहरी " मध्यें अशा अनेक ' लहरी ' आहेत की ज्यांतील अभिव्यक्त सृष्टि अजूनहि आदर्शवादीच वाटावी.

कवीच्या संवेदनांची सृष्टि निरनिराळ्या अवस्थांमधून जाते याचें प्रत्यंतर काव्यांतील कल्पनासृष्टि व प्रतिमा-संकेत यांच्यावरून येण्यासारखें आहे; हा पहा रम्याद्भुत स्वप्नाळूपणाः

एक करीं मधुगीतें हात तुझा अन्य करीं
नौकेपरी रजताच्या पुनवेचा चान्द वरीं
परिमळती रातफुलें
रेंगाळत वायु डुले
स्वर्ग कुठें ? स्वर्ग कुठें ? पृथ्वीवर ! पृथ्वीवर !

या कवीला " नैशापुरवासी कवी " ची ( उमर खैय्यामची ) साद ऐकूं येते; तोहि साकीला म्हणतो आहे कीं "पेला भर मदिरेचा जोंवर हा घट भरला ! " पण हें सर्व स्वप्न असून वास्तवतेच्या जाणीवेनें तें भंग कसें पावतें तें कविच सांगतो:

तरुछाया नवयुवती सुरईतिल मधुर सुरा
कविता करि हृदयंगम नंदनवन होत धरा !
धृष्टपणें त्यांत शिरे
भाकरिचा तुकडा रे
तुकड्यानें त्याच परी स्वप्न सर्व भंगत हें !

"नवथर हृदयामधल्या स्वप्नांच्या धाग्यांनी घरटें बांधून कवि अद्भुतरम्य "रानीं " राहात होता. पण तें घरटें वास्तवतेच्या जाणीवेनें म्हणजेच "पहिल्या परि वादळांत घरटें उध्वस्त होतें," "आणिक ना उरलेलीं स्वप्नें हृदयांत अतां !" याच—"पूर्वीच्या नवथर"—अवस्थेंवरील ही सुंदर " जीवनलहरी " हि पाहा कशी स्वप्नरम्य आहे !

अश्रू हें मौक्तिक हो संसृतिच्या जलधींतिल
मानवतेवर उमले निर्मल कीं जीवनफुल
नयनावर नीलांतुन
झालें हें दंवसिंचन,
स्फटिकाचें इवलेसें मन्दिर वा करुणेचें !

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अश्रूंचें हें रसरूप एखाद्या निर्व्याज बालकाच्या किंवा मुग्ध युवतीच्या नयनांत कवीच्या सौंदर्यवादी नजरेला आढळलें असेल. पण आजच्या भयानक अवस्थेंत जीं आसवें मानवाच्या डोळ्यांत उभीं राहतील त्यांचें वर्णन कवि अशा प्रकारें कसें करूं शकेल ? तें दुःख व्यक्त करावयास अश्रूवरील ही उत्प्रेक्षा पुरेशी नाहीं. तेथें जळजळीत साधे शब्दांचे भालेच पाहिजेत —अगदीं केशवसुती गोफणींतील ओबडधोबड दगडच पाहिजेतः

जरतारी वस्त्र महा   माणुसकीचें विणलें
संतांनीं जीवित निज   त्यासाठीं खुडुनि दिलें !
दंभाच्या स्वार्थाच्या
व्यवहारी अर्थाच्या
लोहावर लागुनि घस   हन्त, चिरे तें शतधा !

पण या दंभाच्या-स्वार्थाच्या आघातांमुळें कवि 'नास्तिक' किंवा तुच्छतावादी मात्र बनत नाहीं. या कवीच्या प्रतिभेची हीच महत्ता आहे. त्याच्याहि "हृदयतमीं एक दीपकळी" जळते आहे. पण सर्वसामान्य परंपरावाद्यांच्या ईश्वरापेक्षां हा निराळा आहे. तो "अंधांच्या देवळात रमत" नाहीं; तो "श्रद्धांच्या शृंखलांत कैद झालेला" नाहीं. या हृदयतमीं" तेवणाऱ्या "दीपकळी" मुळेंच कवीला अंतीं ज्योतिर्मय भविष्याचा साक्षात्कार होतो आहेः

आला रथ ! उदयाचलिं   ज्वालेसम झळके ध्वज
उधळी ती चक्रगति   नीलावर आरुण रज
वेदांनीं अभिवादन
केलें ज्या तेजोधन
तिमिराच्या वेशींतून   धरतीवर येत पुन्हां !

हा अग्नि आणावयास बद्ध प्रामीथिअस् पुन्हां बन्धमुक्त व्हावयास पाहिजे. सौन्दर्यवादी ( रोमॅन्टिक ) मनोवृत्तींचेंच हेंहि उदात्त अवस्थांतर आहे. हें आपणाला शैलीच्या उदाहरणानें पटावें. वरील 'जीवनलहरींत' कवि जरी पुरातन वेदांनीं अभिवादन केलेल्या तेजोधनाचेंच आवाहन करीत असला तरी तो पुनरुद्धारवादी मात्र नाहीं. पण तसाच तो जड वास्तववादीहि नाहीं. सर्व संवेदनांचा समतोल सांभाळून घेतलेल्या अनुभूतींचा काव्यमय आविष्कार जीवनाला परिपुष्ट करणाराच असणार. कवि कुसुमाग्रजांच्या या हृदयंगम "जीवनलहरी" म्हणूनच खऱ्याखुऱ्या अर्थानें जीवन-लहरी ठरल्या आहेत.

—ना. ग. जोशी.

**पंचवीस वर्षांनंतर**—[ ले.—डॉ. वि. पां. दांडेकर, एम्. ए. पी एच. डी. प्रका.— के. भि. ढवळे, श्रीसमर्थसदन, मुंबई-४. किंमत पावणे दोन रु. ]

प्रस्तुत पुस्तक डॉ. वि. पां. दांडेकर यांच्यासारख्या कसलेल्या लेखकाच्या हातून उतरलें आहे एवढें सांगितलें म्हणजे त्याचा दर्जा काय असेल त्याची कल्पना येईल. लघुनिबंधाचा जन्म झाल्यापासून त्याच्या सर्वांगिण विकासास जी नामवंत लेखकमंडळी लाभली त्यांत प्रा. फडके, खांडेकर, काणेकर, कुसुमावती देशपांडे व दांडेकर हीं नांवें प्रमुख स्थानीं


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

शोभणारीं आहेत. हे सर्व लेखक समकालीन असूनहि प्रत्येकाचे लघुनिबंध कांहीं ना कांहीं वैशिष्ट्यानें व निराळेपणानें नटलेले आहेत आणि त्यामुळेच त्यांनी आपली वाचकांच्या मनावरील पकड कायम ठेवली आहे. डॉ. दांडेकर यांचा 'पंचवीस वर्षांनंतर' हा लघुनिबंध-संग्रह असाच वैशिष्ट्यपूर्ण आहे.

जीवनांतील हरएक कामें करतांना आपल्या मनांत कितीतरी गंभीर, खेळकर किंवा विनोदी विचार येतात. हे विचार येतांना मनुष्य आपल्या अहंकारी वृत्तीशीं व त्याच्या पोटीं असलेल्या अनेक बारीक सारीक वृत्तींशीं खेळत असतो. ही खेळकर वृत्ति पकडून तिला शब्दस्वरूपांत अडकवून ठेवणें हें सर्वांनाच जमत नाही; परंतु डॉ. दांडेकर यांच्या मनाची ठेवणच अशी आहे की आपल्या मनांत आलेले विचार ते सहज पकडूं शकतात व त्यांची अभिव्यक्ति ते प्रामाणिकपणाने करूं शकतात. हें करीत असतांना त्यांच्या मनाची बैठक वैयक्तिक नसून लौकिक असते व म्हणूनच त्यांचे विचार वाचतांना आपण आपल्या जीवनांतील कांही प्रसंगांचीं चित्रें समोर पहात आहों असा भास होतो. 'पंचवीस वर्षांनंतर' या लघुनिबंधामधील अनुभव थोड्या फार फरकाने प्रत्येकाला आपलेच आहेत, असें वाटेल. तोच अनुभव 'नवें जग' किंवा 'भटक्या' मधे असलेला आढळेल. 'मिश्ररागां'तील विचारसरणी सखोल असून अभिनव आहे. सनातनी संगीतज्ञांना ती आवडणार नाही, पण जीवनांतील नवीन नवीन अनुभव घेणाऱ्याला त्यातील नावीन्य व मिश्रपणांतील सौंदर्य आकर्षक वाटेल. 'चाट बनणें' हा लघुनिबंध प्रत्येकाला पटेल व आवडेल पण कोणीहि तसें उघड बोलून दाखविणार नाही, कारण आपली फजीति आपणांशीच राहिलेली बरी असें प्रत्येकालाच वाटतें. म्हणूनच डॉ. दांडेकरांच्या धैर्याचें व प्रामाणिकपणाचें कौतुक वाटतें. हळुवार मनावर बारीक सारिक गोष्टींचे आघात किंवा त्यांच्या प्रतिक्रिया काय होतात हें 'असार पसारा', 'आव्हान', 'माझ्या ग दारावरनं', 'पांढरे केस', 'मनधरणी', 'डामरी रस्ते.' यांमधे दिसून येतें. डॉ. दांडेकर यांनी निवडलेले विषय 'प्रथमदर्शनीं' अगदी बाजूला पडलेले व यःकश्चित वाटतात. पण त्यांच्या लेखणीचा त्यांना एकदा स्पर्श झाला की पुंगीने डुलणाऱ्या नागाप्रमाणे तो तो विषय डोलूं लागतो. त्यांतील सौंदर्याचा व मनोमय तरंगांचा आविष्कार होऊं लागतो व अगदीं शून्य दिसणाऱ्या वारुळांतून जशा असंख्य मुंग्या एकामागून एक एकदम बाहेर पडाव्या तसे विविध विचार त्यांतून बाहेर पडतात. एखाद्या विषयांत शिरण्याचें दार डॉ. दांडेकर यांना अचूक सांपडतें व त्यांतच त्यांची अर्धी अधिक कला साठविली आहे.

डॉ. दांडेकरांनी जीवनाचें सूक्ष्म निरीक्षण केलें आहे व त्यांतील विविध अनुभव घेतले आहेत. त्यामुळे त्यांच्या विचार मांडणीला भरीवपणा आला आहे. लेखक सांगतो आहे हें खरें आहे अशी पदोपदीं वाचकांना साक्ष पटणें यांत लेखनाचें खरें सार्थक आहे. कारण वाचकांच्या अंतःकरणावर तेच शब्द कोरले जातात. डॉ. दांडेकरांना हें श्रेय भरपूर मिळेल. याला दुसरेंहि एक कारण आहे. तें म्हणजे डॉ. दांडेकर हे वृत्तीने कवि आहेत. ही त्यांची काव्यात्म प्रवृत्ति 'नवें जग', 'भटक्या', 'मिश्रराग', 'कुरूप स्त्रिया', 'नालंदा-तक्षशिला' किंवा 'डामरी रस्ते' यांमधे पहावयास मिळते. याच वृत्तीमुळे त्यांच्या लिखाणास रंगत येते; आणि याच रंगतींत त्यांची मधून मधून उद्भवणारी सूक्ष्मतरल विनोदी वृत्ति रसाला उधाण आणून वाचकाचें अंतःकरण खुलविते. या दृष्टीने 'वरसंशो-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

धनाची मोहिम ', ' चाट बनणें ', ' बायकोचा राग ' किंवा ' लग्नें शास्त्रज्ञांनी लावावीं ' हे लघुनिबंध पहावेत.

क्वचित् एखादा परिच्छेद वा एकादें वाक्य उगाच आल्यासारखें किंवा सपक वाटतें; क्वचित् विषयांतर फार झाल्यासारखेंहि वाटतें. पण अशीं स्थळें फारच थोडीं आहेत. पुस्तक वाचून झाल्यावर आपल्या मनावर जो परिणाम शिल्लक रहातो तो त्यांतील विविध अनुभवांचा, खेळाडू वृत्तीचा, काव्यमय प्रवृत्तीचा व प्रसादपूर्ण भाषेचा; आणि तींच डॉ. दांडेकरांचीं ठळकदार वैशिष्ट्यें आहेत.

—(प्रा.) शं. के. कानेटकर

**मनाचे संकल्प**–[ ले. प्रा. म. ना. अदवंत, प्रका० दा. ना. मोघे, स्कूल व कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर. किं. अडीच रु.]

यंदाच्या साहित्य संमेलनांत प्रसिद्ध झालेला प्रा. अदवंत यांच्या तेरा लघुनिबंधांचा हा संग्रह खात्रीने त्यांच्याविषयीं अपेक्षा निर्माण करणारा आहे. फडके, खांडेकर, दांडेकर, काणेकर ही वीस वर्षें लेखन करणारी प्रसिद्ध मंडळी सोडल्यास व कै. ना. मा. संत अपवाद मानल्यास नवोदित लघुनिबंधकारांत प्रा. अदवंत फारच वरच्या रांगेंत बसतील. लघुनिबंध लिहिणें ही आजकाल साहित्यांत फॅशन ठरत असली तरी लघुनिबंध हा प्रकार दिसण्यास सोपा पण लिहिण्यास कठीण असतो हें फारच थोडे जाणतात. संपन्न व्यक्तिमत्त्व, निश्चित दृष्टिकोन, आकर्षक भाषाशैली आणि आत्मनिवेदनांतील मोकळेपणा या कसोटीवर उतरणारे लघुनिबंधकार फारच थोडे आहेत. पण या थोड्या संख्येंत भर घालण्याची अपेक्षा प्रा. अदवंतानी निर्माण केली आहे. त्यांच्या लघुनिबंधांचें वळण हें प्रा. फडके यांच्या संप्रदायाकडे झुकतें आहे असें वारंवार पटतें. घासलेटच्या बारींत उभे राहण्यापासून वर्गांत शिकवण्यापर्यंतचे विविध प्रसंग अत्यंत आत्मीयतेने यांत सांगितले गेले आहेत. पतीपत्नीच्या एकान्तांतील कुजबुजीपासून ते प्रवासाच्या गर्दींतील हमरीतुमरीपर्यंत पसरलेल्या मनोज्ञ व विविध, कोमल व भडक भावनांचीं चित्रें यांत आढळून लेखकाच्या अनुभवांत वाचकहि एकरूप होईल. ' अपेशी कोट ' ' स्वतःभोवतीं फिरणारीं माणसें, ' ' मनाचे संकल्प, ' ' संसारांतील रम्य झरे ' या निबंधांच्या दर्जाविषयीं दुमत होणार नाही. अदवंत हे आशावादी आहेत आणि त्यांच्या निवेदनांत प्रसन्नता आहे. अनुभवाची विविधता व विपुलता, मांडणींतील मोकळेपणा, सहगत्या तत्त्वाकडे केलेलें अंगुलीदर्शन, निरागस विनोद व काव्यात्मकता यांची साक्ष जागोजाग पटेल. शृंगार आढळला तरी असभ्यता नाही, विनोद वाटला तरी उत्तानता नाही आणि उपहास असला तरी व्यक्तिद्वेष नाही–त्यामुळें एक प्रकारें या संग्रहाला सोज्वळ रूप प्राप्त झालें आहे. भाषेंतील प्रा. फडके यांचें लालित्य आज अदवंताच्या शैलींत नसलें तरी ती शैली सरळ साधी व सुबोध आहे आणि वाढत्या सरावाने ती सफाईदार होईल अशी आशा आहे. पण शैलीची उणीव असली तरी लघुनिबंधाचें मर्म ( Spirit ) त्यांना हस्तगत झाल्यामुळें बहुश्रुत रसिकाला आनंद देण्याचें सामर्थ्य त्यांच्या ' संकल्पांत ' आहे हें निश्चित !



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

**तांडव आणि लास्य**— [ लेखक आणि प्रकाशक-बालशंकर देशपांडे, २ राजगुरू निवास, पाईपलेन, वाकोला, सांताक्रूझ, मुंबई-२५; किंमत अडीच रु. ]

१९५० च्या पहिल्या सहामाहींत दोन लघुनिबंधांचे संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. त्यांपैकीं 'तांडव आणि लास्य' हा संग्रह मार्चमध्यें श्री. बालशंकर देशपांडे यांनी प्रसिद्ध केला आहे. 'शिव्या आणि ओव्या' या चमत्कृतिजनक संग्रहाने लघुनिबंधकार म्हणून परिचित झालेल्या या लेखकानें गुणवत्तेंत एक पाऊल पुढें टाकून दहा लघुनिबंध व तीन लघुकथा मिळून तेरा लेख यांत एकत्रित केले आहेत. लघुकथा फारशा वरच्या दर्जाच्या नाहींत कारण कथानकाला रूप आणून देण्याकडे देशपांडे यांनी फारसें लक्ष पुरविलें नाहीं. परंतु लघुनिबंध मात्र चमत्कृति, खोंचक विनोद, विचारगर्भता आणि चटकदार भाषाशैली या गुणसंपदेमुळें आकर्षक वाटतात. सामाजिक दोष गप्पांच्या भरांत नजरेपुढें आणणें हें त्यांच्या लघुनिबंधांतलें एक वैशिष्टय आहे. मनुष्य नियमांसाठीं नसून नियम मनुष्यासाठीं हा विचार असलेला 'धर्मराजाचा रथ' हा लघुनिबंध उल्लेखनीय आहे. 'कविप्रतिभेला पंख अन् कम्युनिस्ट कार्यकर्त्याला कंठ फुटल्यावर त्यांना थोपवून धरणं एकंदर कठीणच,' 'दाढी, विधवा आणि वर्गणी या त्रयीभोंवती हां हां म्हणतां कुतुहलाचें अन् संशयाचे वातावरण निर्माण होतें.' असलीं जागोजागीं सुभाषितवजा पसरलेली चमत्कृतिजनक वाक्यें खांडेकर-संप्रदायाची आठवण करून देतात. सहजगत्या आत्मनिवेदन व हितगुज ह्या मर्माकडे लघुनिबंधांत अधिक लक्ष पुरविलें गेलें असतें व तात्त्विक चर्चेची हौस कमी झाली असती तर लघुनिबंधांचा दर्जा खचित उंचावला असता.

—(प्रा.) म. वि. फाटक

**कालसमुद्रांतील रत्नें** (रत्नकरंडक १ ला)—[ ले. बॅ. गोविंद विनायक देशमुख; प्रका० नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर मूल्य रु. ४ ]

नागपूर प्रांतांतील सार्वजनिक जीवनांत सुप्रतिष्ठित स्थान प्राप्त केलेल्या बॅ. देशमुखासारख्यांचें आत्मचरित्र म्हणजे विविध प्रकारच्या माहितीची खाणच होय. १८९२ ते १९२२ पर्यंतच्या काळांतील कांहीं स्मरणरत्नें त्यांनी संग्रहित करून येथे दिलीं आहेत. रत्नांचा हा १ ला करंडक आहे. या रत्नांना शैलीचा सुबक आकार नाहीं. नैसर्गिक मोत्याप्रमाणे तीं कांहींशीं किरटीं व ओबडधोबडच आहेत, पण त्यांचें पाणी खरें आहे. सरळ व अकृत्रिम वर्णनशैलीमुळे यांतील त्रुटितपणाहि विशेष बाधक झालेला नाहीं. प्रस्तावनाकर्ते श्री. मा. श्री. अणे ( लोकनायक अणे—सध्या बिहारचे राज्यपाल ) यांच्या शब्दांत या ग्रंथाचें महत्त्व असें आहे. "हें चरित्र लिहून लेखकाने नागपूर प्रांताच्या १८९२ ते १९२२ पर्यंतच्या काळांतील सामान्य परिस्थितीवर व सार्वजनिक जीवनाच्या कांहीं प्रायः अज्ञात भागावर प्रकाश पाडणारा एक प्रबल विद्युद्दीप वाचकास उपलब्ध करून दिला आहे." विशेषतः श्री. नारायणराव, डॉ. गोपाळराव व बॅ. गोविंदराव या तीन बंधूंबद्दलचें शेवटचें "बंधुत्रय" हें प्रकरण उल्लेखनीय आहे. "सार्वजनिक क्षेत्रांत पदार्पण" हें त्यापूर्वीचें प्रकरणहि अंतर्गत माहितीच्या दृष्टीने वाचनीय आहे. भाषेवरून जरा सफाईचा हात फिरवून छेदकांछेदकांतील त्रुटितपणाला गोलाई आणली तर पुढील करंडक याहूनहि अधिक स्वागतार्ह होतील.

---

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# परिषद्वार्ता

( चिटणीसांकडून )

**विनंती:**—नवीन वर्षाची पहिली तिमाही संपली आहे. ज्यांनी अद्याप १९५०-५१ ची वर्गणी पाठविली नाही त्यांनी आपली वार्षिक वर्गणी रु. ३ म. ऑ. ने अथवा अन्य रीतीने कार्यालयाकडे पाठवावी. मागील बाकी असल्यास तीहि कृपया पाठवावी.

**सत्कार:**—दि. १५-४-५० रोजीं ३३ व्या साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष राजकवि य. दि. पेंढरकर यांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यांत आला. अध्यक्षस्थानीं आचार्य जावडेकर होते. कार्याध्यक्ष प्रा. जोग, श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. म. वि. फाटक, यांनी अध्यक्षीय गुणगौरवाचीं भाषणें केलीं. पुण्यांतील विविध साहित्यसंस्थांतर्फे अध्यक्षांना पुष्पहार समर्पण करण्यांत आल्यावर प्रा. मंगरूळकर यांनी आभार मानले व समारंभ संपला.

**रा. सा. र. लु. जोशी छायाचित्र-अनावरण:**—परिषदेचे माजी चिटणीस व कळकळीचे कार्यकर्ते रा. सा. र. लु. जोशी यांच्या छायाचित्राचा अनावरण-समारंभ वरील सत्कारप्रसंगीं आचार्य जावडेकर यांच्या हस्तें झाला. रा. सा. जोशी परिषदेच्या निमंत्रणावरून मुद्दाम समारंभास उपस्थित होते. रावसाहेबांच्या परिषद् विषयक कामगिरीबद्दल प्रा. जोग, प्रा. गोखले व आचार्य जावडेकर यांनी प्रशस्तिपर भाषणें केलीं. रावसाहेबांनीहि परिषदेच्या वाढत्या व्यापाबद्दल संतोष व्यक्त करून आशीर्वादपर भाषण केलें.

**३३ वें महाराष्ट्र-साहित्य-संमेलन:**—मुंबई मराठी साहित्य संघाच्या वतीने प्रस्तुत अधिवेशन राजकवि य. दि. पेंढरकर यांच्या अध्यक्षतेखाली दि. ११,१२,१३, व १४ मे १९५० रोजीं भरलें. या संमेलनाचीं वैशिष्ट्यें पुढीलप्रमाणें आहेत. 'महाराष्ट्राची रूपसंपदा' हें प्रदर्शन संमेलनाच्या खुल्या अधिवेशनाच्या जागीं म्हणजे मरीन लाइन्स स्टेशनासमोरील भव्य मंडपांत भरविण्यांत आलें होतें व त्याचें उद्घाटन रियासतकार रा. ब. गो. स. सरदेसाई यांनी केलें. मुख्य संमेलनाचीं उपांगें म्हणून मराठी भाषा व व्याकरण, कथा, काव्य, वृत्तपत्र व टीका हीं पांच शाखासंमेलनें भरविण्यांत आलीं. या पांच शाखासंमेलनांचीं अध्यक्षस्थानें अनुक्रमें प्रा. कृ. पां. कुलकर्णी, श्री. दिवाकर कृष्ण केळकर, श्री. बा. सी. मर्ढेकर, श्री. बाबूराव पराडकर, प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे यांनी मंडित केलीं होतीं. वाङ्मयाविषयक चर्चा व निबंधवाचन या दोन कार्यक्रमांनी संमेलनाची वाङ्मयीन बाजू आणखीनच भक्कम केली. याशिवाय काव्यगायन, नाट्यप्रयोग इत्यादि—नावीन्यपूर्ण भरगच्च कार्यक्रमांनी संमेलनाच्या रंजकतेंत भर घातली. संमेलन एकंदरीने सर्व दृष्टींनी यशस्वी झालें. तें यशस्वी करण्यांत स्वागताध्यक्ष डॉ. भा. ग. वाड, प्रा. द. के. केळकर, श्री. श्री. शं. नवरे, डॉ. अ. ना. भालेराव, श्री. वा. रा. ढवळे, श्री. दि. वि. आमोणकर, प्रा. रा. भि. जोशी, सौ. मनोरमाबाई फडके, श्री. बापूराव नाईक, प्रा. त्र्यं. कृ. टोपे, श्री. चिंतामणि आपटे, श्री. अंबूटकर, चित्रकार गोडसे इत्यादि कार्यकर्त्यांनी अमूप परिश्रम घेतले. संमेलनांत संमत झालेले ठराव अंकांत अन्यत्र दिले आहेत.

**वार्षिक साधारण सभा:**— परिषदेच्या वा. सा. सभा संमेलनप्रसंगीं शुक्रवार दि. १२।५।५० रोजीं आचार्य जावडेकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली. मागील सभेचें इतिवृत्त

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

१९४९-५० चा जमाखर्च व १९५०-५१ चें अंदाजपत्रक यांना संमति देण्यांत आली. शाखासभेने केलेल्या सर्व प्रकारच्या सभासदांच्या वर्गणी हिश्श्यासंबंधी घटनादुरुस्ति करण्यांत आली. आचार्य जावडेकर यांचे आभार मानल्यावर सभेचें काम संपलें.

**कै. सानेगुरूजी-दुखवटा सभाः—** महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध साहित्यिक व समाजसेवक कै. सानेगुरुजी यांच्या निधनानिमित्त गुरुवार दि. २२।६।५० रोजीं राजकवि यशवन्त यांच्या अध्यक्षतेखाली मा. प. साहित्य मंदिरांत दुखवटा-सभा भरली. प्रा. वा. दा. गोखले, सायी ना. ग. गोरे, श्री. गोपीनाथ तळवलकर व आचार्य स. ज. भागवत यांनीं कै. सानेगुरुजींविषयीं गुणगौरवपर भाषणें करुन श्रद्धांजली वाहिली. सभेंत संमत झालेला ठराव असाः—

"महाराष्ट्रांतील प्रसिद्ध देशभक्त, थोर समाजसेवक व प्रतिभावान् साहित्यिक श्री. पांडुरंग सदाशिव साने ऊर्फ सानेगुरुजी हे रविवार दि. ११–६–५० रोजीं दिवंगत झाले या घटनेने या सभेला अत्यंत दुःख होत आहे. आपलें पवित्र व उच्च ध्येय दृष्टीसमोर ठेवून सानेगुरूजी यांनी जें आत्मसमर्पण केलें त्यामुळे अखिल महाराष्ट्राला दुःखाचा मोठा धक्काच बसला. कै. सानेगुरुजींचें वाङ्मय आबालवृद्ध मोठ्या आवडीने वाचतात. संख्येने व गुणांनी तें वरच्या दर्जाचें आहे. 'श्यामची आई', 'श्याम' इत्यादि पुस्तकें ही मराठी भाषेंतील साहित्यभूषणें आहेत. सानेगुरुजींच्या निधनाने मराठी वाङ्मयाची फार मोठी हानी झाली आहे. ही सभा कै. सानेगुरुजी यांचें आदरपूर्वक स्मरण करून या ठरावाने आपलें दुःख व्यक्त करीत आहे."

**चित्रशाळा विश्वस्तांची देणगीः—** परिषदेच्या चिपळूणकर-सभागृहास चित्रशाळेच्या विश्वस्तांनी पांचशें रुपयांची उदार देणगी दिली. या देणगीबद्दल परीषद् चित्रशाळा विश्वस्तांची ऋणी आहे.

**भेट व सत्कारः—** बनारसच्या 'आज' या सुप्रसिद्ध हिंदी वृत्तपत्राचे संपादक श्री. बाबुराव विष्णु पराडकर यांनी गुरुवार दि. १८।५।५० रोजीं परिषदेस भेट दिली. परिषदेच्या कार्याची माहिती करून देण्यांत आल्यावर त्यांना सत्कार करण्यांत आला.

**कार्यकारी मंडळाची सभाः—** ठराव अंमलबजावणीचा विचार झाला. संपादकाच्या जागेवर प्रा. रा. शं. वाळिंबे यांची नियुक्ति झाली. प्रा. श्री. के. क्षीरसागर यांना स्वीकृत करून घेण्यांत आलें.

**नियामक मंडळाची सभाः—** संमेलन ठराव अंमलबजावणीचा विचार होऊन त्याबाबतींत कार्यकारी मंडळाला आदेश देण्यांत आले.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# म. सा. संमेलन ३३ वें अधिवेशन [ १९५० ] मुंबई

## विषयनियामक समितीनें संमत केलेले ठराव

— १ —

गेल्या अधिवेशनानंतर पुढील साहित्यसेवक निधन पावले याबद्दल या अधिवेशनास अतीव दुःख होत आहे.

दुखवटाः—वा. मा. नाईक, त्र्यं. ह. आवटे, डॉ. ग. य. चिटणीस, गो. पुं. हेगडे देसाई, गो. कृ, मोडक, ना.कृ. दिवाणजी, वेणुबाई हर्षे, रा. ब. न. ब. देशमुख आणि नाथ निफाडकर.

— २ —

महाराष्ट्रांतील भौगोलिक नामांचे विकृत उच्चार आणि त्यांच्या लिखाणांचें विकृत स्वरूप यापुढें राहूं देउं नये. उत्तर व मध्यप्रदेशांत ज्याप्रमाणें हीं नामें सुधारलीं व त्यांचें शुद्ध स्वरूप पुन्हा स्थापित करण्यांत आलें त्याप्रमाणेंच महाराष्ट्रांतील ग्रामनामांचें सरकारी लिखाणांत शुद्धीकरण तज्ज्ञांच्या साहाय्यानें करण्याविषयीं सरकारांस हें संमेलन विनंती करीत आहे.

— ३ —

महाराष्ट्रांत दोन तीन ठिकाणीं मराठी कार्यक्रमांसाठीं नभोवाणी केंन्द्रें असणें अत्यंत आवश्यक आहे. असें असूनहि हिंदुस्थान सरकारच्या भावी योजनेंत महाराष्ट्रांत कोठेंहि केवळ मराठीसाठीं नभोवाणी केंद्र नाहीं याबद्दल संमेलनाला खेद वाटत आहे.

अहमदाबाद आणि धारवाड हीं अनुक्रमें गुजराथी व कानडी भाषेची नभोवाणी-केंद्रें ठरलीं असल्यानें महाराष्ट्रांतील प्रमुख ठिकाणीं मराठीसाठीं केंद्र राखून ठेवणें क्रमप्राप्त आहे. तेव्हां सरकारनें याचा अवश्यमेव विचार करावा व लवकरच मराठीसाठीं स्वतंत्र केंद्रें द्यावी अशी विनंती आहे.

त्याचप्रमाणें मुंबई, औरंगाबाद व नागपूर येथें असणारीं नभोवाणी केंद्रें मराठी भाषिकांच्या प्रांतांत असल्यामुळें त्या केंद्रांवर प्राधान्येंकरून मराठी कार्यक्रम असणें आवश्यक आहे याचाहि मध्यवर्ती सरकारनें अवश्य विचार करावा.

— ४ —

महाराष्ट्र साहित्य परिषद् घेत असलेल्या सर्व परीक्षांना मुंबई व मध्यप्रदेश सरकारांनीं आणि मुंबई, पुणें व नागपूर या विद्यापाठांनीं मान्यता द्यावी.

— ५ —

भारताची राष्ट्रलिपि देवनागरी ही मान्य झाली असल्यामुळें देवनागरी लिपींत मराठी तारा देण्याघेण्याची तात्रडतोब व्यवस्था करावी अशी सरकारांस विनंती आहे.

— ६ —

आजकालच्या वाङ्मयांत शब्दनिर्मिति वाक्यप्रचार, शैली व शुद्धलेखन यांच्या दृष्टीनें जे प्रमाद होत आहेत ते शैलीच्या व शब्दसंपत्तीच्या भवितव्याच्या दृष्टीनें घातुक असल्यामुळें



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्यांचा गंभीरपणें विचार करण्याची वेळ आली आहे. तेव्हा तज्ज्ञांची एक समिति नेमून या परिस्थितीवर योग्य ती उपाययोजना महाराष्ट्र साहित्य परिषदेने करावी असें या संमेलनाचें मत आहे.

— ७ —

गोमंतकांत सध्यां चालू असलेली मराठी भाषेची गळचेपी, वृत्तपत्रांवरील दडपशाही, बाहेरील वृत्तपत्रांवर असलेली प्रवेशबंदी, यांमुळें गोमंतकाच्या सांस्कृतिक विकासाला जोराचा पायबंद बसला असून साहित्य संमेलनासारख्या साहित्यिक चळवळींचीहि कुचंबणा होत आहे, याबद्दल या संमेलनास खेद होत आहे. गोमंतक हा भौगोलिक, भाषिक व सांस्कृतिक दृष्ट्या महाराष्ट्राचा अविभाज्य घटक आहे, असें हें संमेलन पुन्हा एकदां घोषित करीत आहे. गोमंतक हा भारताचाच अविभाज्य विभाग असून त्यावर कोणाहि परकीय सत्तेचा अधिकार भारतीय प्रजाजनांना मान्य होणार नाहीं, असे या सभेचें स्पष्ट मत आहे.

— ८ —

बेळगांव हें बहुसंख्य मराठी भाषिकाचें असूनहि तेथील महाविद्यालयें सक्तीनें कर्नाटक विद्यापीठास जोडल्यानें तेथील मराठी भाषिकांवर अन्याय होत आहे. म्हणून भाषावर प्रान्तरचना होईपर्यंत तेथील महाविद्यालयें पुणें किंवा मुंबई विद्यापीठास जोडून घेण्याचें स्वातंत्र्य कर्नाटक विद्यापीठाच्या कायद्याच्या ५ व्या कलमाच्या आधारानें त्या त्या महाविद्यालयांस देण्यांत यावें, अशी मागणी हें संमेलन मुंबई सरकारास करीत आहे.

— ९ —

हिंदी संघराज्यांतील एकूण लोकसंख्येची शिरगणती लवकरच होणार असून या गणतीत नागरीकांच्या भाषेचा उल्लेख प्रधान आहे. यामुळें या शिरगणतीला भाषावार राज्यरचनेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्व प्राप्त होत आहे. विशेषतः महाराष्ट्राच्या सरहद्दीचे व सरहद्दीलगतचे जे भाग आहेत त्यांचें भाषिक स्थान या शिरगणतीच्या माहितीवरून स्पष्ट होणार असून कारवार, हल्याळ, सुपा, बेळगांव, शहापूर, सोलापूर, ठाणें जिल्ह्यांतील कांहीं भाग, डांग, बस्तर संस्थान, छिंदवाडा, बालाघाट वगैरे सारख्या सीमेवरील भागांच्या भाषिक व राजकीय भवितव्यावर निःसंशय परिणाम होणार आहे. म्हणून या शिरगणतीच्या वेळीं भाषिक माहिती योग्य रीतीनें नमूद करून घेण्यासाठीं महाराष्ट्र साहित्य परिषदेनें स्वतः व इतर संस्थांच्या सहकार्यानें जोरदार प्रयत्न व प्रचार आतांपासून सुरू करावा व स्वयंसेवक दल उभारून हें नोंदणीचें कार्य योग्य तऱ्हेनें पार पाडून घ्यावें व दोन्ही भाषांचे गणक सरकारकडून नेमून घ्यावे असा आदेश हें संमेलन म. सा. परिषदेस देत आहे. तसेंच हें कार्य करण्यासाठीं परिषदेनें स्वतंत्र निधि उभारावा असें हें संमेलन ठरवीत आहे.

— १० —

लोकशाहीची निकोप जोपासना, घटक राज्यांचा सुव्यवस्थित व्यवहार आणि संघराज्याची बळकटी व एकजूट हीं सर्व उत्कृष्टपणें साधावयाचीं तर हिंदी संघराज्याचीं घटक राज्यें भाषावार तत्त्वास अनुसरूनच साधण्यांत आलीं पाहिजेत. इतिहासाचा व व्यवहाराचा दाखलाहि याच सिद्धान्तास पोषक आहे.

हा सिद्धान्त लक्ष्यांत घेऊनच मराठी साहित्य संमेलनाच्या बेळगाव येथें इ. स. १९४६ सालीं भरलेल्या अधिवेशनांत 'संयुक्तमहाराष्ट्र' या भाषिक घटक राज्याच्या स्थाप-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

नेची मागणी संमेलनानें केली. अल्प कालांतच महाराष्ट्राच्या सर्व विभागांतून या मागणीला प्रचंड असा एकमुखी पाठिंबा मिळाला, याबद्दल या संमेलनास अत्यंत आनंद व संतोष वाटत आहे.

तथापि लोककल्याण साधणारी ही सरळ व न्याय्य मागणी मान्य करून तिला सरकार-कडूनहि मान्यता मिळाविण्याचे कामीं संविधान सभेंतलि सूत्रचालकांकडून जी टाळाटाळी झाली, त्याबद्दल या संमेलनास अत्यंत दुःख वाटतें.

तथापि अंतिम यशप्राप्तीविषयीं निराशेचा कसलाहि पगडा मनावर बसूं न देतां आणि आपल्या मागणीच्या मागील एकजूट व तीव्रता अधिकच बळकट करून सर्व भाषाप्रेमी व देशहितैषी नागरिकांनीं मागणी पदरांत पडेपर्यंत योग्य, न्याय्य व शांततेच्या मार्गानें सर्व प्रकारचे उद्योग सतत चालू ठेवावेत अशी या संमेलनाची त्यांस आग्रहाची विनंती आहे.

भाषावार घटक राज्यें स्थापण्याचें काम तूर्त लांबणीवर टाकण्यांत आलें असलें तरी

(१) कारवार जिल्ह्यांतलि कारवार, सुपा व हल्याळ हा भाग मुंबई सरकारनें द्विभाषिक ठरवून मराठी भाषिकांवर होणारा एक अन्याय अंशतः दूर केला याबद्दल या संमेलनास आनंद होत आहे. तथापि या भागांतील बहुसंख्य जनता मराठीभाषी असल्यामुळें कारवार व बेळगाव जिल्ह्यांतील मराठीभाषी सलग प्रदेश यांचा एक स्वतंत्र जिल्हा करणें राज्यकार-भाराचे दृष्टीनें सोयीचें व रोजचा व्यवहार आणि शिक्षण यांना मोकळें वातावरण उत्पन्न करणारें होईल ही गोष्ट मुंबई सरकारच्या नजरेस आणून देणें या संमेलनाला आपलें कर्तव्य वाटतें. भाषावार प्रांतरचना होईपर्यंत भाषावार जिल्हे तयार करण्याचें आपल्या अधिकारांतील काम मुंबई सरकारनें लवकर उरकल्यांस त्या त्या भागांत धुमसणारा असंतोष कमी होण्यास मदत होईल असा या संमेलनाला विश्वास वाटतो.

(२) हैदराबादची पुनर्घटना करतांना त्या राज्यांतील मराठी, कानडी व तेलगु या भाषा बोलणाऱ्या प्रजांना त्या त्या भाषा बोलणाऱ्या शेजारच्या समभाषिक विभागांत विलीन करणें हेंच त्यांच्या भाषिक, शैक्षणिक व सांस्कृतिक विकासास पोषक होईल आणि शिवाय त्यामुळें लोकशाहीच्या अभिवृद्धीसही साहाय्य होईल. एकदां पुनर्घटना करतांना अव्यवस्थित व अशास्त्रीय विभागणी होऊन गेली म्हणजे मागाहून पुन्हा त्याची भाषावार पुनर्विभागणी करणें फार अडचणीचें होऊन बसतें हा अनुभव लक्षांत घेतला असतां भारतीय सरकारनें व हैदराबाद राज्याच्या जनतेनें जागरूक राहावें आणि अवश्य ती उपाय योजना करण्यांत कसूर करूं नये, असें या संमेलनाचें त्यांस कळकळीचें सांगणें आहे.

— ११ —

इंदूर संस्थानच्या अधिपतींनीं नाट्यवाङ्मयाच्या प्रोत्साहनासाठीं रु. १२५०/. चें पारितोषिक व श्री. राजकवी काळेले यांना १००१ रु. वर्षासन देऊन मराठी वाङ्मयाची फार मोठी सेवा केली आहे. परंतु अलिकडे वरील पारितोषिक व वर्षासन यांच्या रकमा प्रतिवर्षी दिल्या जात नाहींत असें समजतें. हें संमेलन अशी विनंती करीत आहे कीं इंदूर संस्थान व ज्या ज्या इतर संस्थानांनीं अशा वाङ्मयीन कार्यासाठीं आर्थिक साहाय्य देण्याचा परिपाठ ठेवला आहे त्या सर्वांनीं अशाप्रकारचें आर्थिक साहाय्य दरवर्षी त्या त्या व्यक्तींना व वाङ्मयीन संस्थांना द्यावें.

———



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## — संपादकीय —

### महाराष्ट्र साहित्य संमेलन : तेहतिसावें अधिवेशनः —

प्रस्तुत अधिवेशनांत संमत झालेले ठराव आणि त्रोटक वृत्त हीं ह्याच अंकीं अन्यत्र देण्यांत आलीं आहेत. संमेलनासंबंधी अधिक कांही लिहिण्याची आता दीड महिन्यानंतर, आवश्यकता नाही. अनेक वृत्तपत्रांतून आणि नियतकालिकांतून त्यासंबंधी साभिप्राय व सविस्तर समाचार येऊन गेला आहे.

संमेलनाला जसें स्वरूप यावें अशी सुज्ञांची कल्पना होती तसें तें अधिकांत अधिक आणण्याची चालकांनी प्रयासपूर्वक योजना केली होती. शाखासंमेलनांनी सर्व अधिवेशनाला भरघोसपणा आला होता. तथापि ' अशीं ' शाखा संमेलनें असावींत का, असा एक प्रश्न पडतो. प्रत्येक शाखासंमेलनास स्वतंत्र संचालक आणि स्वतंत्र अध्यक्ष अशी नियुक्ति मुंबईच्या अधिवेशनांत शक्य झाली तरी सर्वच ठिकाणीं शक्य होईल असें नाही. शाखासंमेलनाऐवजीं साहित्याच्या ज्या कांही विभागांचा स्वतंत्र विचार व्हावा असें वाटत असेल त्या प्रत्येका-करितां एक एक प्रहर राखून ठेवून त्या त्या विभागांत प्रबंध वाचन व्हावें, तात्कालिक महत्त्वाचा एकादा प्रश्न चर्चिला जावा, एकाद्या प्रवक्त्याने समालोचनात्मक भाषण करावें अगर तसा कांही मुद्दा मांडण्यासारखा असल्यास तो मांडावा. ह्या सर्व विभागांच्या कार्य-क्रमांना निरनिराळ्या अध्यक्षांची जरूरी नाही. सर्व कार्यक्रम संमेलनाध्यक्षांच्या नेतृत्वा-खालीच चालावेत. तरच संमेलनाची एकविधता अभंग राहील.

* * *

### गोमंतक मराठी साहित्य संमेलन : पांचवें अधिवेशन

बेळगांव येथें प्रस्तुत अधिवेशन प्रसिद्ध वृत्तपत्रकार व साहित्यिक श्री. प्रभाकर पाध्ये यांचे अध्यक्षतेखाली यशस्वीपणे पार पडलें. श्री. बा. द. सातोस्कर हे स्वागताध्यक्ष होते. स्वागताध्यक्षांनी "भाषिक प्रश्न हाच गोमंतकाचा खरा प्रश्न" ह्या मुद्यावर भर देऊन आपलें भाषण केलें. अध्यक्ष श्री. पाध्ये यांनी "गोमंतकाच्या सांस्कृतिक पुनर्जन्मा" चें जें स्वरूप आपल्या भाषणांत रंगविलें त्यावरून त्यांच्या अभ्यासीवृत्तीचा आणि विचारशीलतेचा उत्तम प्रत्यय येतो.

प्रस्तुत संमेलनांत मंजूर झालेल्या ठरावांत प्रादेशिक संमेलनांच्या एकसूत्रतेबद्दल जो ठराव झाला तो ठिकठिकाणच्या साहित्यसंस्थांनीं त्वरित लक्षांत घेण्यासारखा असल्यामुळे इथे देत आहोंत.

### प्रादेशिक साहित्य संमेलनाचा ठराव

'महाराष्ट्रांत गेलीं अनेक वर्षे प्रादेशिक संमेलनें भरण्याची जी प्रथा रूढ झाली आहे; ती इष्ट अशीच आहे असें या संमेलनाचें मत आहे. परंतु या संमेलनाच्या कार्यांत सुसूत्रता निर्माण करणारी अशी एकादी घटना नसल्यामुळे या प्रादेशिक संमेलनांची शक्ति वाया जात आहे. म्हणून महाराष्ट्रांतील सर्व प्रादेशिक संमेलनांना मार्गदर्शक होईल, परंतु तपशीलांत सर्वाधिक स्वातंत्र्य राहील अशी एक घटना महाराष्ट्र-साहित्य-परिषदेने तयार करावी व त्या घटनेप्रमाणेच प्रादेशिक संमेलनें भरविण्यांत यावी. अशी घटना तयार करण्यासाठी महाराष्ट्र

अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाचणे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

साहित्य परिषदेचे अध्यक्ष व कार्यवाह, तसेंच ठिकठिकाणच्या प्रादेशिक संमेलनांचा एकेक प्रतिनिधि अशा सभासदांची एक समिति नेमावी अशी या संमेलनाची म. सा. परिषदेला विनंती आहे.'

ह्या ठरावांतील कल्पनेला मूर्त स्वरूप येण्याची किती आवश्यकता आहे ती सहज समजण्यासारखी आहे. परिषदेच्या कार्यकारी मंडळाने ह्या ठरावाचा विचार करून, अशी योजना तयार करण्याचें ठरविलें आहे. अर्थात ही योजना सिद्ध होणें इतर साहित्यसंस्थांच्या सहकार्यावर अवलंबून आहे.

* * *

## शोकसमाचार

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्याशीं ज्यांचा कोणत्या ना कोणत्या तरी नात्याने महत्त्वाचा संबंध आला होता आणि मराठी वाङ्मय क्षेत्रांत ज्यांचा प्रेमादराने उल्लेख होई असे कांही थोर महाराष्ट्रीय ह्या तिमाहींत दिवंगत झाले.

**( १ ) श्रीपाद महादेव वर्दे** - हे दि. १८-५-५० रोजी कालवश झाले. मुंबई मराठी साहित्य संघाच्या संस्थापकांपैकीं ते एक महत्त्वाचे घटक होते. वृत्तपत्राचे संपादक म्हणून त्यांचें नांव मशहूर होतें. म. सा. परिषदेच्या घटनेला ज्यांनी कळकळीने हातभार लावला अशा व्यक्तींत त्यांची गणना होई. "शाहिरी वाङ्मया" विषयींचा त्यांचा ग्रंथ विश्रुत आहे.

**( २ ) अण्णासाहेब लठ्ठे**—हे दि. १६-५-५० रोजी कालवश झाले. ह्यांनी तहहयात सभासद होऊन परिषदेशीं आस्थेवाईक नातें जोडलें होतें; इतकेंच नव्हे तर बेळगाव येथे १९२९ साली झालेल्या म. सा. संमेलनाचे ते स्वागताध्यक्षच होते. चरित्रकार म्हणून मराठी साहित्यांत त्यांचें नांव नमूद आहे.

**( ३ ) साने गुरुजी**—यांच्या परलोकगमनाने दि. ११-६-५० हळहळला नाही असा मराठी वाचक नसेल. किंबहुना महाराष्ट्रीय नसेल. एक शुद्धशील, विनम्र, आणि कळकळीचा समाजसेवक म्हणून त्यांनी सर्वांची अंतःकरणें जिंकून घेतलीं होतीं. रंजल्यागांजल्यासाठीं आपुलकीने कष्टणें आणि मनाने तिळतिळ तुटणें हा त्यांचा मनोधर्म होता. पण मेणाप्रमाणे मऊ असलेला हा विष्णुदास सत्याग्रहाची कास धरून कठिण वज्रासहि लवविण्याइतका खंबीर होता. जो स्वभावधर्म आचरणांत तोच त्यांच्या लिखाणांतहि दुथडी भरून वहात असे. समाजाच्या सेवेचें साधन म्हणून त्यांनी साहित्य निर्मिलें असलें तरी त्यांत केवळ प्रचारकी आग्रहीपणा व रुक्षपणा नसून त्यांत माऊलीचें अयांग वात्सल्य हेलावत असल्यामुळे अबालवृद्ध वाचकांचीं मनें त्यांनीं अंकित करून घेतलीं होतीं.

त्यांचें निधन म्हणजे त्यांनी स्वखुषीने घेतलेला जगाचा निरोप होय. स्वातंत्र्य प्राप्तीनंतर भारताच्या सामुदायिक जीवनांत जो काळेंबेरें पणा बोकाळला आहे आणि ज्यामुळे भवितव्याविषयींच्या कल्पनेने मन व्यग्र होतें त्यामुळेच गुरुजींचें चित्त अलीकडे अतिशय विकल झालें असावें. आणि म्हणूनच, स्टीफन झ्वाईग याने ज्याप्रमाणे जगाचा निरोप घेतला त्याचप्रमाणे साने गुरुजींनी देवाचें बोलावणें येण्याची वाट न पाहतां I, all too impatient, go on before असें म्हणत आपणच देवलोकाची वाट धरली असावी जगाच्या कल्याणाची चिंता वाहात वाहात जे जगले आणि ज्यांनी देह ठेवला अशा संतांच्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मालिकेंत ज्याचें नांव शोभावें अशा योग्यतेच्या ह्या साहित्यिकाबद्दल किती लिहावें तितकें थोडेंच होईल.

( ४ ) ना. त्र्यं. भिडेः—दि. ११-५-५० रोजी दिवंगत झाले. श्री. भिडे परिषदेचे तहहयात सभासद होते व परिषदेच्या परीक्षांसाठी नियुक्त केलेल्या पुस्तकांच्या बाबतींत ( एक नामवंत प्रकाशन– मॉडर्न बुक डेपोचे मालक या नात्यानें ) त्यांचें साहाय्य होत असे.

× × ×

( ५ ) ग. शं देवः—धुळयाचे प्रसिद्ध समर्थभक्त श्री. शंकरराव देव यांचे चिरंजिव ग. शं. देव हे दि. १२-६-५० रोजी दिवंगत झाले. धुळें येथील म. सा. संमेलनास त्यांनी बरेंच साहाय्य केलें. " रामदास-रामदासी " त्या मासिकाचें संपादनहि अलीकडे ते करत असत.

× × ×

( ६ ) भास्करराव जाधव—पत्रिकेचा हा अंक छापून पुरा होत आला तोंच भास्करराव जाधव यांच्या निधनाची वार्ता थडकली दि. २६-६-५० रोजी त्यांचें देहावसान झालें. संस्कृताच्या अभ्यासांत विद्यार्थीदशेपासून त्यांनीं प्रावीण्य दाखविलें होतें. एक व्युत्पन्न पंडित म्हणून त्यांना महाराष्ट्र ओळखीत असे. आपल्या अभ्यासाचा परिपाक स्वतंत्र दृष्टिकोनांतून अनेक लेखांद्वारे त्यांनी मराठी वाचकांपुढे मांडला आहे. म. सा. परिषदेचे ते सभासद होतेच. मुंबई उपनगर साहित्य संमेलनाच्या १९३५ च्या अधिवेशनाचें स्वागताध्यक्षपद त्यांनीं भूषविलें होतें.

मराठीच्या ह्या सर्वच थोर सुपुत्रांच्या निधनाने परिषदेला दुःख होत असून संपादकीय लेखणीहि ह्या दिवंगतांना आदरपूर्वक श्रद्धाञ्जली अर्पण करीत आहे.

* * *

## संपादकीय व्यवस्थेंत फेरबदल

संमेलनाचा अध्यक्ष हाच परिषदेचाहि अध्यक्ष म्हणून राहणार असल्यामुळे कार्यकारी मंडळावर माझे जागीं प्रा. श्री. के. क्षीरसागर यांची स्वीकृति झाली आहे.

पत्रिकेची संपादकीय कामगिरी कार्यकारी मंडळाच्या एका सदस्याकडे रहावी, अशी घटना असल्यामुळे हा अंक सभासदांच्या हातीं दिल्यावर संपादकीय जबाबदारींतून मी बाजूला होत आहे. आजवर संपादक मंडळांत असलेले प्रा. रा. श. वाळिंबे ह्यांना ' संपादक ' म्हणून कार्यकारी मंडळाने नियुक्त केलें आहे. ह्या उभयतांचें मी प्रेमादराने स्वागत करतों.

म. सा. पत्रिकेच्या द्वारे मी परिषदेची जी सेवा करूं शकलों तिचें सर्व श्रेय पत्रिकेच्या लेखकवर्गाकडे आहे. प्रा. सखारामपंत आपटे, डॉ. म. वि. आपटे, श्री. य. ग. फफे, प्रा. धु. ना. वीरकर, यांच्या सहाय्याबद्दल मी त्यांचा अतिशय ऋणी आहें. प्रा. रा. म. मराठे यांची लघुनिबंधकार म्हणून वाचकांना प्रथम ओळख करून देण्याचा मान म. सा. पत्रिकेला मिळाला. श्री. वि. स. खाडेकर हेहि पत्रिकेला लेखनसाह्य देऊं शकले ह्याचा अवश्य उल्लेख करायला हवा. तसें म्हटलें तर सर्वच कवि, लेखक आणि परीक्षणकार यांचा उल्लेख करायला पाहिजे. कारण ह्या सर्वांनी हा निरपेक्ष अनुग्रह केला म्हणूनच पत्रिकेला हें रंगरूप आलें आहे. ह्या सर्वांचा मी कृतज्ञतेने निरोप घेतों.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# नवीन सभासद

## तहहयात

( १ ) प्रा. दिनेश बलवन्त कुलकर्णी,
५८७।९ शुक्रवार, पुणें २
( २ ) प्रा. दत्तात्रय बापू रानडे,
१२२७ लेले क्वार्टर्स, पुणें ४

## साधारण

( १ ) पं. महादेवशास्त्री जोशी,
४२१ शनिवार, पुणें २
( २ ) श्री. माधव बलवन्त मनोहर,
शिवाजीपार्क रस्ता ३, मुंबई २८
( ३ ) ,, पांडुरंग मार्तंड ठुसे,
३१ वेताळ पेठ, पुणें २
( ४ ) ,, माधव दत्तात्रय वैद्य
१० अ, टिळक रस्ता, पुणें २
( ५ ) ,, हिरालाल कुंदनमल वर्मा,
१९६।८७ सदाशिव, पुणें २
( ६ ) ,, हणमन्त शिवराम जोशी, गोखले बिल्डिंग, टिळक रस्ता, पुणें २
( ७ ) ,, जी. व्ही. चिखलीकर, वकील, कपीलतीर्थ, कोल्हापूर.
( ८ ) ,, भी. ल. परतूडकर, महबूबगंज, परभणी ( निजामस्टेट )
( ९ ) ,, वामन विष्णु वाटवे, वकील, एक्सटेंशन, सांगली
(१०) ,, केशव शिवाजी दीक्षित,
ओगले वाडा, सांगली.
(११) ,, कृष्णाजी त्र्यंबक पानसरे,
वझेवाडा, जुनी सांगली.
(१२) ,, अनन्त गोविंद कुलकर्णी,
फडणीसवाडा, मारूतीरोड, सांगली
(१३) ,, माधव दत्तात्रय कुलकर्णी,
सावळजकर, बुधगांव.
(१४) ,, नागेश चिंतामण ताम्हनकर,
जुनी सांगली.
(१५) ,, विठ्ठल सखाराम पागे, वकील,
हायस्कूलरोड, सांगली.
(१६) ,, दत्तात्रय श्रीधर देउस्कर,
गणपति मंदिर, सांगली.
(१७) ,, गणेश राजाराम वाळिंबे,
५९४ सदाशिव, पुणें २
(१८) ,, राजा शंकर माने,
३८६ ठळकवाडी, ( बेळगांव )
(१९) ,, पुरुषोत्तम स. कुलकर्णी, बारामती ( जि. पुणें )
(२०) ,, विद्याचंद्र गुलाबचंद कोठारी,
सराफबाजार, गुलबर्गा.
(२१) प्रा. त्र्यंबक कृष्ण टोपे, आंग्रेवाडा,
काळबादेवी, मुंबई २
(२२) श्री. चंद्रकांत गंगाराम पैंगणकर,
६९ मुगभाट क्रॉस लेन, मुंबई ४
(२३) ,, लक्ष्मण पुरुषोत्तम भाटवडेकर,
२२ लॅबर्नम रोड, मुंबई ७
(२४) ,, सखाराम पांडुरंग जोशी,
समर्थ प्रेस, ठाणें.
(२५) प्रा. विश्वनाथ कृष्ण निमकर,
आरवा लाइन्स, सुरत.
(२६) श्री. यशवन्त गोपाळ निसुरे,
कचरेवाडी, पुणें ४
(२७) ,, मा. ह. टिळक,
न्यू. इं. स्कूल, सातारा
(२८) ,, रघुनाथ बळवन्त लिमये
५६४ शनिवार, पुणें २
(२९) ,, लक्ष्मण गणेश निमकर, पोपटलाल चाळ, रानडे रोड, मुंबई १४
(३०) ,, यशवन्त रंगनाथ पानसरे,
९८६ कसबा, पुणें २

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

